# काळेकुट्ट ढग !

तीं दोघेंही एकमेकांना अनुरूप होतीं. त्यांचें तें मोकळें आनंदपूर्ण संभाषण मी किती तन्मयतेनें ऐकत होतों ! पण त्यामुळें माझ्या हृद-याच्या खोल भागांत रुतून राहिलेला कांटा हलुच हलविल्याप्रमाणें मला झालें.

वाफोर संथपणें चालत होता. पाणी शांत होतें. तें ख्रिश्चन जोडपें आपल्याच संभाषणांत मग्न झालें होतें. मी मात्र अस्वस्थ मनानें इकडेतिकडे पाहिलें. तरी माझें लक्ष त्या प्रेमी तरुणांकडे लागलें होतें. कां ?...

ती सुंदर म्हणूनच का ? मुळींच नाहीं. त्याच वाफोरांत दुसऱ्या सुंदर स्त्रिया होत्या. कदाचित् या तरुणीपेक्षांही त्या अधिक सुंदर असतील;

पण त्या हिंदु होत्या. त्यांच्यांत जीवंतपणा नव्हता, व्यक्तिवैशिष्ट्य नव्हतें. त्या बसल्या होत्या तेथें एक प्रकारची गाढ खिन्नता पसरली होती. एक प्रकारच्या जडतेनें वातावरण भारावलें होतें. त्या इकडेतिकडे मोकळे मनानें पहात नव्हत्या. भोंवतालच्या विविध नैसर्गिक दृश्यांकडे पाहून त्यांतील आनंद उपभोगण्याची शक्ति त्यांच्यांत नव्हती. त्या पुरुषांशीं बोलत नव्हत्या. फक्त एकमेकांशीं कुजबुजत होत्या. पण तें कुजबुजणेंच मला भयाण वाटत होतें. कोमेजलेलें फूल कुणाला पहावतें का ? आमच्या हिंदु स्त्रियांचें आयुष्य हें असें !

पण ती ख्रिश्चन तरुणी किती आनंदानें, लाडिकपणानें, निरनिराळ्या विषयांवर, लहान बालिकेप्रमाणें हावभाव करून, बोलत होती ! तिच्या शब्दांत हृदय होतें, काव्य होतें, बुद्धिविलास होता, उन्मादक प्रणय-चेष्टितें होतीं आणि मोहक गांभीर्य होतें. ती बोलतांना हंसत होती. क्षणांत गोरीमोरी होत होती, क्षणांत रागावत होती, क्षणांत आवाज चढवून वाद करीत होती. आणि लगेच आपल्या प्रियकराचे दोन्ही हात पकडून त्याला बालिश प्रश्न करीत होती. जीवंत माणसाच्या सगळ्या क्रिया तेथें दिसत होत्या. हृदय आणि बुद्धि सुस्थितींत असलेल्या व्यक्तीच्या उत्कट, विविध जीवनाचा तो आविष्कार होता. आणि मी शून्य मनानें पण आतुर कानांनीं माझ्या अधीर डोळ्यांपुढील तें दृश्य पहात होतों !

दुसऱ्या बाजूस भरतीचें पाणी बांधाच्या "मानशें"तून जवळच्या शेतांत पडत होतें, त्याची सळसळ स्पष्ट ऐकूं येत होती. वीस पंचवीस कुळवाडी लोक—पुरुष आणि स्त्रिया—रांगेनें उभे राहून शेताचे कुणगे खणीत होते. बांधावरच्या झुपकेदार गर्द झाडांच्या माथ्यावर बसलेले बगळे व बळारी वाफोराच्या खडखडाटानें दचकून उठत; झाडाभोंवतीं घिरट्या घालीत व पैलतडीच्या दिशेनें उडून जात. सूर्यबिंब अजून डोंगराच्या आड झालें नव्हतें. आकाश विविध रंगाच्या आकृतींनीं नटलें होतें. आणि त्यांचें प्रतिबिंब नदीच्या संथ पाण्यांत पडलें होतें. पैलतडीला कितीतरी अजस्र 'फत्तेमारी' अस्ताव्यस्त पडलेल्या होत्या. माडमाड

उंचीचे त्यांचे कुंवे निष्पर्ण वृक्षांप्रमाणें भेसूर दिसत होते. कांठच्या नारळीच्या झाडींत कोळ्यांच्या झोंपड्या अर्धवट दिसत होत्या आणि त्यांतून निघणारा धूर झाडीच्यावर तरंगत होता.

त्या तरुण जोडप्याचें संभाषण मोठ्या रंगांत आलें होतें. संभाषणाचा विषय मात्र घटकेघटकेला बदलत होता. पणजीच्या दिशेनें दुसरा एक वाफोर चालला होता. त्यांत चिकार गर्दी भरली होती. वाफोराकडे पहात त्या तरुणीनें म्हटलें:

—आज वाफोरांत लोक चिकार भरले आहेत.

—जुन्या गोव्याला आज जत्रा ना? तिथंच चालले हे लोक.

—सां. फ्रांन्सीस्काच्या जत्रेला वाटतं? यांची ही धडपड पाहिली म्हणजे वाटतं कीं हे लोक फार धार्मिक असावेत.

—आहेतच तसे ते. श्रद्धा असल्याशिवाय का लोक इतका पैसा खर्च करून व त्रास सोसून तिथं जातात?

—होय तर! किती पण श्रद्धाळू! अन तुला खरोखरच हे लोक श्रद्धाळू वाटतात का? मला तर हा सगळा श्रद्धेचा देखावा दिसतो. मनांत देवाबद्दल प्रेम नाहीं, पण प्रत्येकाची धडपड आपण धार्मिक आहों हें दाखविण्याची.

— मग हा दांभिकपणा लोक कां करतात? त्यांचा यांत कसला फायदा?

—धर्मानें सांगितलेले सगळे आचार पाळले म्हणजे मनुष्य धार्मिक वाटूं लागतो अन् धार्मिक मनुष्य नीतिमान्, सदाचारी असतो असे मानण्याकडे लोकांचा कल असतो. मला तर आतां असं वाटूं लागलं आहे कीं धर्माचं कर्मकांड जो अधिक पाळतो तो परमेश्वरापासून अधिक दूरावतो. परमेश्वराला आवडणाऱ्या गुणांचें पोषण त्याच्याकडून योग्य रीतीनें होत नाहीं.

—ओल्गा! तूं दिवसेंदिवस नास्तिक होत चाललीस, असं नाहीं तुला वाटत?—त्यानें विनोदानें म्हटलें.

—नाहीं. मला लोकांच्या ढोंगाचा तिटकारा आहे. सद्गुणी मनुष्य हाच जगांत खरा धार्मिक होय.

त्यांचें हें भाषण चाललें असतांना नदीच्या एका लहानशा फांद्यांतून एक नाव येतांना दिसली व माझें लक्ष तिकडे वळलें.

नावेंत दहा बारा ख्रिश्चन कामकरी उघडेच बसले असून जोरजोरानें वल्हीं मारीत होते; टोंकाला बसलेला एक तरुण कोंकणींत कांहीं गात होता. नंतर ते सगळे लोक त्यानें म्हटलेल्या ओळी मोठ्यानें एका तालावर व एका सुरावर म्हणत होते. नाव झरझर जात होती. पाण्याचा केवढा तरी आवाज होत होता. आणि त्या आवाजाच्या साथींत " बाबू भाटकारालो फेर्नांदु गोरेलो ज्याकिना भुलोलो ऽऽऽ ज्याकिना भुलोलो ऽऽऽ " हें प्रेमगीत आसपास ऐकूं येत होतें.

ओल्गाची नजर एका बाजूला बसलेल्या हिंदु स्त्रियांकडे गेली. हाच विषय तिला बोलायला पुरे झाला. तिनें नवऱ्याला म्हटलें:

—त्या पाहिल्यात का हिंदु बायका ?

—हो. फारच विनयशील दिसतात त्या.

—त्यांना तूं विनयशील म्हणतोस का ? भित्रेपणा अन् विनय यांतील फरक तुला कळूं नये ना ?

—विनयशीलता हा हिंदु स्त्रियांचा एक गुण आहे.

—कुणी सांगितलं हें तुला ? तुरुंगांत असलेला भयंकर गुन्हेगार तेथील अधिकाऱ्याच्या आज्ञा पाळीत असतो म्हणून का त्याला आज्ञाधारक म्हणतां येईल ? धर्मानं, परिस्थितींनं त्या बायकांना असं करून टाकलं आहे. निरनिराळ्या बंधनामुळं भित्रेपणा हा त्यांचा स्वभावगुण बनलेला आहे. इतर जातीच्या स्त्रियांत जो अवगुण मानला गेला असता तोच हिंदु स्त्रियांत स्वाभाविक गुण झालेला आहे.

—तसंहि असेल.

—तुला असली बायको आवडली असती का ?

—तिचं कौतुक केलं असतें पण मला ती आवडली नसती.

—त्यांच्याप्रमाणं मी तुझ्यापासून मान खालीं घालून दूर जाऊन बसलें असतें तर आवडलं असतं का तुला ? हें पहा. कांहीं मिनिटं मी होऊं का त्यांच्याप्रमाणें ?

—मला शिक्षाच होईल ती, अन् तुला देखील.

याप्रमाणें निरनिराळ्या विषयांवर त्यांचें संभाषण चाललें होतें. प्रत्येक गोष्टींत ती स्वतःचें मत प्रतिपादन करी.

वाफोर शेवटीं धक्क्याला लागला.

वाफोरांतून उतरून मी घराकडे येऊं लागलों. मनांत वाफोरांतलें दृश्य नाचत होतें. सगळा जन्म जिच्या सहवासांत घालावयाचा तिचें मन मला समजत नाहीं. माझें तिला समजत नाहीं. माझ्या आवडी वेगळ्या, तिच्या वेगळ्या. कोणत्या शब्दांत, कोणत्या रीतीनें मी तिची समजूत घालूं ? निरनिराळ्या प्रकारांनीं मी तिला शिकवीत आलों कीं माझ्या सुखांत अजून उणीव आहे, माझ्या वैवाहिक अपेक्षा सफल होत नाहींत. पण ती कांहीं आपलें वर्तन सोडीत नाहीं. परिस्थितीची, परंपरागत संस्कारांची पकड इतकी घट्ट असते का ?

मी घरांत आलों. बाहेरच्या दालनांत मी नाजुक वेलींच्या कुंड्या ठेविल्या होत्या, त्यांपैकीं एक जमिनीवर पडून फुटली होती व सगळीकडे माती पसरली होती. कोपऱ्यांत तिचें लुगडें अस्ताव्यस्त पडलें होतें. आंत काय दिसेल त्याची ही पूर्व सूचनाच होती.

मी आंत गेलों. वसुंधरा नुसत्या जमिनीवर बसून पीठ झारीत होती. तिच्या तोंडावर आणि केंसावर पावडर मारल्याप्रमाणें पिठाचा थर सांचला होता. तिच्या पांढऱ्या पातळाला बरेच डाग दिसत होते. तिचें सगळें सौंदर्य मालिन्यांत, गबाळपणांत लोपलें होतें. चेहऱ्यावर नेहमीप्रमाणेंच वैराग्यपूर्ण गांभिर्य होतें.

माझ्या भावना, माझे विचार मी प्रयासानें दाबले. नाजुक मनाची हळुवार भावनांची पोर ती. वेडी असेल पण त्यागी होती. माझ्याकरतां, मुलांकरतां तिनें आपल्या व्यक्तित्वाचा त्याग केला होता. तिच्याशीं कठोरपणानें बोलणें, वागणें जिवावर येई. पण यामुळेंच माझा अधिक कोंडमारा होत होता.

मला पहातांच ती गडबडीनें दचकून उठली. तिला आपली चूक कळत असे. पण सहजच ती आपणाला हवें तें करून जात असे.

—किती छान दिसलीस तूं आज ? पण पावडर जरा जास्त बसली ! —मी मूळ मुद्यावर येण्याकरतां हंसतच म्हणालों.

तिनें गडबडीनें नेसणानें चेहरा पुसला. केंसांवरून हात फिरविला. पातळ झाडल्यासारखें केलें आणि ती गोरीमोरी होऊन म्हणाली: "असं काय म्हणायचं तें ? पीठ झारतें ना मी ? आजच संपलं. आपण येणार म्हणूनच इतक्या घाईनें बसलें होतें पीठ झारायला."

—मोलकरीण आजारी आहे वाटतं ?

—तसं नाहीं. पण....असलीं कामं मोलकरणीकडून होतात का ?

—अन् सैंपाकीणबाई ? तिनं हक्काची रजा घेतली असेल, नाहीं ?

—ती मला म्हणाली, जरा फिरून येतें. मी म्हटलें जा. बाकी तिला दिखील काळजीनं करतां येत नाहीं हें काम. आपलीं कामं लोक काळजीनं करतात का ?

संसारांतील बारीकसारीक कामें जातीनें करायचीं आणि स्वतःविषयीं उदासीन असावयाचें हा तिचा नेहमींचा क्रम. आणि त्याच अनुरोधानं ती आतां बोलत होती. नवऱ्याकरतां, मुलांकरतां सगळा संसार. आपल्याकरतां संसार नाहीं, ही तिची भावना.

—मग सगळीं कामं तूंच करीत जा. गड्याची अन् मोलकरणीची तरी गरज काय ? तुझ्या संसारासाठीं तितक्या पैशांची बचत होईल—मी म्हटलें.

—बाकी तसं होतंच आहे सध्यां—ती साधेपणानें बोलत होती. पण मला गुदमरल्यासारखें होत होतें.

—वसू, मग असं करणं तुला बरं वाटतं कां ?

—वाटलं न वाटलं, तरी तुमच्या सुखासाठीं हें केलंच पाहिजे ना ?

—माझं सुख !.......माझ्या सुखाकरतांच मला नको असलेलं तूं करतेस नाहीं ? माझ्या सुखाकरतांच तूं या उघड्या जमिनीवर बसतेस आणि हें मळकं पातळ वापरतेस ? देहाची काळजी घेत नाहींस ? केसांचा अंबाडा अव्यवस्थित घालतेस ? फिरायला जात नाहींस ? सैंपाकीण असतांना चुलीत तोंड खुपसून बसतेस ? संसाराचीं

निरनिराळीं कामें उकरून काढून त्यांत दंग होतेस ? अन् तूं घरांत असून मी मात्र एकटा असतों ? माझ्या सुखासाठींच हें सगळं होतं आहे !

मी खोलीत जाऊन कपडे काढले. माझी रागावलेली मुद्रा पहातांच ती माझ्या मागोमाग आंत आली आणि आर्जवी स्वरांत म्हणाली :

—नका ना असं बोलूं. मी काय वाईट केलं ? सांगा ना ? मी आपल्याकडे कधीं दुर्लक्ष्य केलं का ? मुलांची काळजी घेतली नाहीं का ?

—नाहीं. पण तूं स्वतःकडे दुर्लक्ष्य करतेस.

—पण माझ्या देहाची इतकी काळजी मी कां घ्यावी ? सुंदर दिसायलाच ना ?

—हो, तूं मला सुंदर दिसली पाहिजेस.

—असं काय बोलतां आपण ? माझ्या सौंदर्याचा इतका बडेजाव कशाला तो ?

—माझी तशी आवड म्हणून.

—मग मी आपणाला सौंदर्यासाठींच हवी ना ? माझ्यावर आपलं प्रेम नाहीं तर ?

तसें पाहिलें तर ती मला सौंदर्याकरतांच ज्यास्त हवी होती. संसाराकरतां नको होती. मला सौंदर्य पाहिजे आणि तिला संसार पाहिजे. पण तिची संसाराची व्याख्या मात्र भलतीच !

—वसू, असं काय वेडंवाकडं बोलतेस तूं ? पण माणसानं संसाराकरतां सगळं सोडायचं का ? आपल्या व्यक्तीचं सुख म्हणून कांहीं असतंच कीं नाहीं.

—तुमच्या आणि मुलांच्या सुखांतच माझं सगळं आलं !

—माणूस अन् बाव्हलं यांत फरक नाहीं का ?

—पण मी स्वतःला नाहीं बाव्हलं समजत.

—तूं स्वतःचं आयुष्य तुटलेल्या तारेप्रमाणं करून घेतलं आहेस असं नाहीं तुला वाटत ?

—मी बाव्हलं, मी तुटलेली तार... —वसुंधरा सकंप आवाजांत बोलत होती.

—वसू, तुझं व्यक्तित्व मरत चाललं आहे. प्रत्येकाला व्यक्तिवैशिष्टय हवं. स्वतःच्या आवडीनावडी हव्यात. आपल्या हिताचा ध्यास हवा. नवरा व बायको. यांच्यांत विरोध नसला तरी वेगळेपणा, भिन्नत्व हवं. या भिन्नत्वामुळंच आयुष्याला जीवंतपणा येत असतो, संसारांत खळबळ चालू असते. नदीच्या पाण्यांत प्रवाह असतात. म्हणून तिचं पाणी चांगलं राहतं. पाण्याला गती नसली म्हणजे डबकं सांचतं. तसं आपलं आयुष्य...

मी बोलत होतों. प्रेमळपणानें, सावकाश बोलत होतों...आणि ती माझें व्याख्यान ऐकत होती.

आज मी थोडें उघड बोललों इतकेंच. बाकी निरनिराळ्या सौम्य प्रकारांनीं मी तिला माझ्या आवडीनावडी नेहमीं सांगत होतों. पण ती आपल्या संसारांत गुरफटलेली. माझें मन तळमळत होतें. अपेक्षित सुखासाठीं धडपडत होतें. मी वेडा होतों अन् ती फार शहाणी, फार व्यवहारी होती असें हवें तर म्हणा. पण माझी मनोरचना मुळापासून ही अशी होती. वसुंधरा ज्याला 'संसार' 'संसार' म्हणत होती, त्या संसाराला माझ्या आयुष्यांत गौण स्थान होतें. मुख्य म्हणजे स्त्रीसुख. खाणें जेवणें म्हणजे कांहीं संसार नव्हे. सुंदर स्त्रीच्या ललितरम्य सहवासांत आयुष्यांतील दिवस घालवावे हीच माझी इच्छा. मुलांबद्दल उत्कट ओढ माझ्या मनांत केव्हांच उत्पन्न झाली नाहीं. त्यांच्या सहवासाकरतां मन तळमळलें नाहीं. उलट प्रत्येक मूल आमच्या सहवासांत वेगळेपणा उत्पन्न करीत होतेंसें मला वाटे.

वसुंधरा थोडावेळ राहून आंत निघून गेली. मी खुर्चीवर बसून विचार करूं लागलों. कोणत्या आशा बाळगून मी लग्न केलें अन् शेवटीं काय झालें? लग्नापूर्वीची वसुंधरा किती वेगळी होती! जशी सुंदर तशीच आनंदी, हुशार, वादपटु, बुद्धिमान. माझ्या एका नातेवाईकाची ती मुलगी होती. माझें त्यांच्याकडे जाणें येणें होतें. मला जांवई करावा असें जेव्हां त्यांच्या मनांत आलें तेव्हांपासून वसुंधरेची

माझ्याशीं जी वागणूक होऊं लागली, तेवढेंच कायतें माझ्या विरंगुळ्याचें स्थान! तिचें बोलणें चालणेंच कां, प्रत्येक क्रिया, प्रत्येक अवयव जणुं काय प्रेमानें, उल्हासानें भरलेला असे. तिच्या पदक्षेपांत मला नर्तिकांचें सहेतुक लालित्य दिसे. तिच्या हास्यांत निष्प्रेम हृदयांत चैतन्य ओतण्याचें सामर्थ्य होतें. तिचे ते हंसणारे गोड डोळे माझ्यावर किंचित् स्थिर झाले म्हणजे मला वाटे कीं, आयुष्य म्हणजे पक्षांचें आकाशांतून भ्रमण.

वसुंधरा घरच्या माणसाशीं उलट बाजू घेऊन कित्येक बाबतींत भांडे. तिला स्वतःच्या आवडीनिवडी होत्या, मतें होतीं. आपल्या व्यक्तित्वाचें पोषण करणारी क्रिया तिच्या हातून क्षणोक्षणाला सहेतुक घडत होती. ती सुंदर केशभूषा करी. सुंदर रीतीनें बारीक कुंकुं रेखून लावी, तलम पातळें कलापूर्ण रीतीनें परिधान करी. ती पुस्तकें वाची, सुंदर पत्रें गोड भाषेंत लिही....

पण हें सगळें लग्न झाल्यानंतर हळुहळू नष्ट होत गेलं. पूर्वीची वसुंधरा, पूर्वीच्या सगळ्या आवडीचा त्याग करणारी, स्वताचीं मतें नसलेली, माझ्याशीं वादविवाद न करणारी ठरली. असें कां व्हावें?

मी तिच्यावर कोणतींच बंधनें घातलीं नव्हतीं. उलट माझ्या स्वताच्या इतकेंच व्यक्तिवैशिष्ट्य तिच्यांतही असावें अशी माझी इच्छा होती. मग असें कां?

मला आपल्या जाळ्यांत पकडावें म्हणूनच लग्नापूर्वी तिचीं सगळीं लाघवें होतीं कां? पण लग्नापूर्वी ती नेहमींच तशी होती. तिचा स्वभावच तसा होता. नवरा मिळाला म्हणजे आपण आपलें ध्येय गांठलें, मग इतर धडपडी कां?—अशी स्त्रियांची वृत्ति असते कां? देहाबरोबर त्याला मन अर्पण करायचें, बुद्धि अर्पण करायची, सगळें सगळें गमावून बसायचें आणि मुलें झाल्यावर त्यांची शुश्रुषा करून त्यांतच सुखसर्वस्व मानून आयुष्य कंठावयाचें हा जो आदर्श हिंदु स्त्रियांपुढें शेंकडों वर्षांपासून धर्मानें, रूढीनें, परंपरेनें ठेवला आहे, त्याचाच तो परिणाम असेल कां?

मी तळमळत होतों. माझें सौंदर्यपिपासू मन भुकेनें तडफडत होतें. किती विवेकानें, किती प्रयासानें त्याला दाबांत ठेवायचं? क्षणक्षणाला बाहेरच्या जगांत मोहाचे प्रसंग येत, पण मी मनांत म्हणत असें: "वसुंधरा वेडी आहे अन् माझ्याकरितां त्याग करते आहे. माझ्या आवडीसाठीं तिची फसवणूक!..." पण हा कोंड-मारा किती दिवस चालू ठेवणार?

मला त्या वाफोरांतील प्रेमळ जोडप्याची आठवण झाली. नवऱ्याचें जीवित आनंदमय करणारी ती स्त्री!

मी खिडकींतून बाहेर पाहिलें. आंब्याच्या झाडींतून चंद्रबिंब दिसत होतें. आकाशांत असंख्य तारका आपलें व्यक्तित्व सांभाळून चम-कत होत्या.

वीस पंचवीस हातांच्या अंतरावर असलेल्या एका घराच्या खिडकीं-तून एका गायिकेचे स्वर माझ्या कानावर पडले. मी तिकडे वळून पाहिलें. एक स्त्री खिडकीपाशीं बसून गात होती. तिचा सुंदर चेहेरा प्रकाशांत स्पष्ट दिसत होता.

माझें मन विचित्र स्थितींत सांपडलें होतें. मी फिरून आकाशांत पाहिलें. काळ्या कुट्ट ढगांनीं आतां चंद्रबिंब व्यापून टाकलें होतें.

६-१०-३४.

कल्पवृक्षांच्या छायेंत
प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई

# कौमार्याचे बंध

—प्रभूंच्या गजरेनं बापाच्या नांवाला काळोखी फांसली !

—कुठची गजरा ? इथं होती ती का ?

—हो, तीच. रामचंद्र बाबांची थोरली मुलगी. फार सुंदर होती पोरगी !

—मला फार आवडत होती ती. पण तिच्या सौंदर्याचं चीज हें असं झालं.

—काय केलं तिनं ?

—लग्न झालं नव्हतं तिचं अजून; पण आतां ऐकतें, कीं तिच्या हातून पाप घडलं अन् तें उघडकीला आलं !

—शिव ! शिव !

—कुलवानाची मुलगी म्हणून इतकं वाईट वाटतं! सहा महिन्यापूर्वी इथं होती ती. माझ्याकडे नेहमीं येत असे बसायला. मला फार आवडत असे ती. पण पोरीच्या दैवांतलें कोण काढणार?

हें संभाषण माझ्या कानीं पडलें आणि मी दचकून उठलों. गजरेचं पाऊल वांकडें पडलें! हातांतलें पुस्तक मी मेजावर टाकलें व अंथरुणावर पडलों.

मी गजरेला ओळखत होतों. सरासरी दीड वर्ष तिची मंडळी इथेंच होती. सहा महिन्यापूर्वी अकस्मात् एक दिवस तिचें बिऱ्हाड गेलें आणि आज ही बातमी कानावर पडते!



गजरेची मंडळी दोन वर्षांपूर्वी इथें आली त्या वेळचा प्रसंग. संध्याकाळची वेळ, मंगेशच्या देवस्थानच्या प्राकारांत किती आनंदाची असते! देवळापुढच्या भव्य स्तंभांवर, कोंवळ्या उन्हांत पारव्यांचीं जोडपीं क्रीडा करीत बसलीं होतीं. खालीं बांकांवर तरुण तरुणी बसली असून तीं संभाषणांत दंग होऊन गेलीं होतीं. अग्रशाळांच्या कडेनें लावलेल्या फुलझाडांना फुलांचा बहर आला होता आणि सगळ्या वातावरणांत एक प्रकारचें अनिर्वचनीय माधुर्य भरून राहिलें होतें.

गजरा मागच्या दरवाजानें देवळांत शिरली. सगळीकडे संगमरवरी शुभ्र पाषाणाचें काम. जणुं काय एकाद्या वज्रदेही पुरुषाचें कांतिमान अंगच! गजरेच्या गांवांत संगमरवरी कुठले? काळ्या दगडांचाच तिथें भरणा!

अनपेक्षित सुख लाभल्याप्रमाणें गजरेला आनंद झाला. ती देवाच्या पाया पडली व तिनें आपली उत्कंठेनें भरलेली नजर देवळांत फिरविली. सगळीकडे रसिकता अन् वैभव यांचा मिलाफ! शुभ्र भिंतींना मोठमोठ्या तसबिरी लावलेल्या होत्या. विलासी मोहिनी! विश्वामित्र आणि मेनका! उर्वशी! अशीं रविवर्म्याचीं उन्मादकारी चित्रें! बाजूच्या दालनांत देवाचा रुपेरी पलंग. त्यावर रेशमाची सुंदर शय्या! बाहेर दोन मोठे बिलोरी आरसे. छताला लोंबकळणारे अजस्र झुंबर!

गुंडाळून ठेवलेले उंची गालिचे ! रेशमी कापडावर कलाबतूनें मढविलेलीं नयनमनोहर चित्रें; देवालयांचे व आसपासच्या रम्य स्थलांचे फोटो; उदबत्त्यांचा, फुलांचा व अत्तरांचा मिश्र सुगंध वातावरणांत दरवळलेला !

हें सगळें पाहून गजरेच्या वृत्ती भांबावून गेल्या. एक प्रकारची गोड व अननुभूत भावना तिच्या तरुण देहांत स्फुरण पावली. तिच्या हृदयाची कळी उमलली. तींतून कसला तरी सुगंध निघाला व त्यामुळें तिच्या कौमार्यानें रसरसलेल्या गात्रांत माधुर्य संचरलें !

देवळाच्या पुढच्या दरवाजांतून तिची नजर तलावावर पडली. तिचे सरल भावदर्शी नेत्र चमकले. तिनें प्राकार ओलांडला व ती तलावाजवळ येऊन पोंचली.

थोड्याशा अंतरावर उभें राहून तिनें खोलांत असलेल्या समोरच्या तलावाकडे पाहिलें. सुंदर बांधकाम केलेला तो भव्य तलाव. आंत भरपूर निळसर पाणी. पलीकडे बोटभर शेत वाढलेलें हिरवें वायंगण. गजरेचा गांव अगदींच रुक्ष होता. उघडे बोडके डोंगर व रखरखीत माळरानें. त्याच्या विरोधानें पुढचें दृश्य कितीतरी रम्य दिसत होतें !

आश्चर्यानें तिचे ओंठ सहजच विलग झाले व अस्फुट हास्याची रेषा तिच्या औत्सुक्यपूर्ण मुखावर उमटली. तिचा चेहरा लालसर दिसूं लागला व तिच्या डोळ्यांत तन्मयतेचें पाणी तरळूं लागलें.

इकडे तिकडे पहात ती सावकाश पायऱ्या उतरूं लागली.

खालीं तलावांत एक तरुणी कपडे धूत होती. ती सुंदर व मोहक होती आणि तिची केशरचना, तिची पातळ नेसण्याची पद्धति मनांत भरण्यासारखी होती. तिनें आपल्या नेसणाचा कांचा मारला होता व यामुळें शरीररचनेचा रेखीवपणा स्पष्टपणें दिसून येत होता. पायाच्या शुभ्र पोटऱ्या उघड्या होत्या. ती ओणव्यानें धूत होती यामुळें कंचुकीनें आवृत्त असलेलें तिचें अर्धस्फुट वक्षःस्थल मधुर रीतीनें कांपत होतें.

गजरा शेवटच्या पायरीवर पोंचली व तिची नजर जवळच पड-लेल्या रुप्याच्या मासोळीकडे गेली. तिनें ती चट्कन् उचलून घेतली व ती त्या तरुणीजवळ आली.

तिच्याकडे तन्मयतेनें पहात, हातांत धरलेली मासोळी पुढें करीत गजरेनें म्हटलें:

—ही मासोळी तुमची का ?

—खरंच, माझ्या पायांतली गळून पडली ती—चंद्रेनें मान वर उचलून गजरेकडे कृतज्ञतेनें पहात म्हटलें आणि तिनें ती मासोळी हातांत घेतली! गजरेचा अनोळखी चेहेरा व त्यावरील कुतूहलाचे भाव पाहून चंद्रा म्हणाली:

—तुम्ही इथं नवीन दिसतां.

—आम्ही कालच आमच्या गांवाहून आलों.

—या देवाचे तुम्ही महाजन वाटतं ?

—आम्ही महाजन या देवाचे. पण देवाकरतां आलों नाहीं आम्हीं.

—मग ?

—आमच्या बाजूला राण्यांचं बंड उद्भवलं आहे ना ? दोनचार दिवसापूर्वी गांवांतलीं दोन घरं देखील लुटण्यांत आलीं. म्हणून आम्ही इथं आलों. ही जागा फार सुंदर आहे, नाहीं कां ?

—तुमच्या गांवांत तलाव नाहीं वाटत ?

—आमच्या गांवांत तलाव नाहीं अन देऊळही नाहीं. सगळीकडे रुक्ष! इथं मला किती बरं वाटतं!

—आतां तुम्हीं इथं राहणार तर!

दोघींच्याही वृत्ति हळूहळू जुळल्या व थोड्याच वेळांत त्यांचें संभाषण रंगांत आलें.

—बाबांची इच्छा असली तर वर्षभर राहयचं. तरीपण सध्याच कांहीं आम्हीं जात नाहीं.

—बरं झालं. राहाच तुम्ही इथं कांहीं दिवस. इथलीं सगळीं स्थळं मी तुम्हाला फिरून दाखवीन.

—इथं बायका बाहेर फिरतात का ?

—मग तुमच्याकडे बायका बाहेर फिरत नाहींत वाटतं ?

—आमच्याकडे असलीं बंधनं फार ! गांवचे इतर लोक बरंवाईट बोलतील म्हणून आम्ही घराबाहेर पडत नाहीं.

—इथं तसं नाहीं. बायकांना हवं तिथं फिरायला मिळतं आमच्याकडे....अन् इथं दिवस किती मजेंत जातो !

—खरंच का ?

—जत्राउत्सव होतात, लोक येतात, देवळांत गाणीं होतात, पालख्या निघतात, कलावंतिणींचा नाच होतो, सकाळ सायंकाळ चौघडा झडतो अन् दिवस कसे जातात तें कांहीं कळत नाहीं.

चंद्रेनें अंगांतली कंचुकी काढली व ती पाण्यांत उतरली. दुसऱ्या पायरीवर कंबरभर पाण्यांत तिनें उडी मारली व पाण्यांतून बाहेर येऊन ती अंग चोळूं लागली.

—तुमचं घर कुठं ?—गजरेनें प्रश्न केला.

—इथं अगदीं जवळच. माझं अंगधुणं हें आटोपलंच. माझ्याबरोबर या तुम्हीं. मी तुम्हाला आमचं घर दाखवितें अन आपण मिळून फिरायला जाऊं

—मी इथं नवीन. मला कोणीतरी इथची माहिती द्यायला हवं होतं. तुमची ओळख झाली हें फार बरं झालं. मला फार आनंद झाला.



वृत्तींत साम्य असलें, हृदयांत समान भावना खेळत असल्या म्हणजे सहजच आकर्षण उत्पन्न होतें. दोघीही तरुण, सुंदर अन् कुमारिका. एक पूर्ण विलासिनी, रसिक, रंगेल. दुसरी रुक्ष वातावरणांतून, निरनिराळ्या बंधनांतून नुकतीच सुटलेली. खालच्या थरावर असलेली जड हवा उष्णतेनें विरल होते अन् वर जाते, नाहीं का ?

सौंदर्याचें कृत्रिम संस्करण झालेली चंद्रेची नाजुक देहलता, प्रेक्षणीय केशभूषा, पाण्यांतून वर येऊन परिधान केलेलें तें झिरझिरीत वस्त्र, तिच्या हातांतील नाजुक घडणीचीं कंकणें, चेहऱ्यावरचा शृंगारिक भाव

आणि तिच्या काळ्याभोर डोळ्यांतील चंचलतेचें, स्वैरतेचें पाणी, हें सगळें पाहून गजरेच्या मनांत कसली तरी हुरहुर उत्पन्न झाली.

थोड्या वेळानें त्या दोघीजणी चंद्रेच्या घरीं पोंचल्या. चंद्रेनें तिला आपल्या आईच्या खोलींत नेलें व पलंगावर बसायला सांगितलें.

गजरा बसली. घराच्या धुराड्यांतून धुराची बारीक धार निघावी व तिनें सगळें वातावरण धूसर व्हावें त्याप्रमाणें आतांपर्यंत निरनिराळ्या बंधनांनीं आवृत्त असलेल्या तिच्या हृदयाच्या एका छिद्रांतून गूढ व रम्य अशा एका उन्मादस्वरूप भावनेची धार निघाली व तिनें गजरेचा देह व्यापून टाकला.

चंद्रेनं विड्याचा डबा आणला व गजरेसाठीं विडा करीत तिनें म्हटलें:

—तुझं नांव काय तें विचारलें नाहीं मी अजून—बहुमानार्थी भाषा नष्ट झाली.

—माझं नांव गजरा.

—गजरा, किती सुंदर नांव तुझं !

—अन् तुझं नांव नाहीं सांगितलंस तूं अजून

—मला चंद्रा म्हणतात. माझं नांव वाईट आहे, नाहीं का ?

—तसं नाहीं कांहीं. बाकी नांवांत काय आहे ? तुझं रूप तितकंच सुंदर आहे ना ? लग्न झालं आहे का तुझं ?

—आमचं लग्न व्हायचं नसतं ....

—कां ?

—मी कलावंतिणीची मुलगी .... आमची शेंस घालायची असते.

—मग शेंस घातली का तुला ?

—पुढच्या आठवड्यांत घालायची ठरली आहे.

—अन् शेंस घातल्यानंतर .... ?

—नंतर ... आम्ही इतर पुरुषांशीं वागायला स्वतंत्र होतों.

तरुण कुमारिकांच्या भावना काय सांगितल्या पाहिजेत ? तारुण्यांत एक काल असा येतो कीं, त्यावेळीं शृंगारिक, वैषयिक गोष्टींची विचिकित्सा करण्यांत तरुण मनाला समाधान वाटतें.

शिवाय सतरा वसंतऋतु गज़रेच्या हृदयाला स्पर्श करून गेले होते.

—तसं करतांना तुम्हाला वाईट वाटत नाहीं?—गजरा जिज्ञासेनें म्हणाली.

—वाईट वाटण्यासारखं त्यांत काय आहे? तुम्ही एकाच पुरुषाशीं संबंध ठेवतां, आम्हाला पुष्कळांशीं ठेवायला मोकळीक असते.

—अन् तुम्ही सुखी असतां?

—किती वेडा प्रश्न हा? आमचं सुख तुम्हाला लाभणं नाहीं.

—?

—पुरुषांचं सुख आम्हाला लाभतं पण बंधन नसतं.

—पण पोटाची काळजी?....

—सुंदर स्त्रियांना ही काळजी नसते. माझी अजून शेंस घातली नाहीं ना? पण किती तरी श्रीमंत तरुणांच्या मागण्या आईपाशीं आलेल्या आहेत.

आजपर्यंत निरनिराळ्या बंधांत गुरफटलेलें सौंदर्यविन्मुख असें आपलें मन वाऱ्यावर तरंगत आहे, आपल्या उत्फुल अवयवांत एक जोरदार पण मधुर संवेदना उत्पन्न होत आहे व तिच्या उन्मादकारी प्रवाहांत आपलें पूर्वीचें भीरु, दुबळें व लज्जायुक्त मन न्हाऊन निघत आहे असें गजरेला वाटलें.

चंद्रा म्हणजे कलावंतिणीची पोर, त्यांत सुंदर, शिवाय कुमारिका, तिला नीतिअनीतीची काय चाड! मन चंचल तसें बोलणेही उच्छृंखल! आपल्या शब्दाचा परिणाम अजमावण्याची तिला काय गरज?

चंद्रा विडा करतांना बोलत होती आणि गजरा विचित्र मनस्थितींत ऐकत होती.

—शेंस घातल्यावर मग तूं...

—मी इतरांची होणार. अन् तूं गजरा, तुझ्यासंबंधीं बोलली नाहींस तूं. तुला एकदोन तरी मुलं असतील!

—माझं लग्न झालं नाहीं अजून.

—खरंच! इतकं वय झालं अन् नवरा नाहीं?

—आमच्यांत आतां उशिरां लग्न करतात.

—अन् मग ....?

—मग काय ...?

—कांहीं नाहीं ....!

—लग्न वाईट वाटतं तुला?

—आमच्या शेंसेपेक्षां वाईट.

—तें कसं ...?

—नवरा वाईट निघाला तर जन्मभर दुःख. मेला तर विचारायलाच नको—चंद्रेनें फटकळपणाचा कळस केला.

—अस्सं? ...—गजरा पुटपुटली.

—अन् आमचं आयुष्य किती सुखी! विलास अन् वैभव यांचा नेहमीं उपभोग घ्यायचा. नृत्यगायनानं आयुष्याला सुखी करायचं. चंद्रा सहज बोलत होती आणि गजरेच्या मनांत सहजच कोणतीतरी हुरहुर उत्पन्न होऊं लागली होती! त्या उंच पलंगावर गाद्यांची मऊर शय्या घातली होती.

रेशमी अभ्र्यांच्या गिरद्या आजूबाजूला ठेवल्या होत्या. हिरवा रंग दिलेल्या भिंतींना निरनिराळीं श्रृंगारिक भाव जागृत करणारीं चित्रें लावलीं होतीं. एका कोपऱ्यांत तंबोरा होता. पलंगाखाली तबला दिसत होता.

—माझ्या शेंसेला तूं आलं पाहिजेस, अं?

—मला कसं यायला मिळेल?

—आम्ही कलावंतिणी म्हणून का?

—तसं नाहीं, पण आई मला पाठवील?

—इथं शेंसेला आमच्याकडे बामणाच्या बायका खुशाल येतात. जेवायचं नसतं तुम्ही, नुसता फराळ करायचा अन् मौज पाहून जायचं.

—आईला सांगून पहातें.

—मी माझ्या आईला मुद्दाम तुझ्या आईकडे आमंत्रण करायला पाठवितें. मग तर झालं?

—बरं, मग मी येईन.

—मग मी तुझ्या लग्नाला येईन. अन् नाच-गाणं करीन, फुकट करीन, कांहीं देखील घेणार नाहीं.

—मग तुला गायला-नाचायला येतं तर ?

—मी मुद्दाम शिकलें आहें.

—मला म्हणून दाखीव पाहूं एक गाणं !

—उद्यां दाखवीन.

—नको, आतांच दाखीव. उद्यां येणार नाहीं मी !

—आतां गायन केलं तर उद्यां येशील ?

—हो, येईन. पण आधीं गाणं म्हण.

चंद्रा उठली. तिनें तंबोरा आणला व ती गायला बसली.

गायनांत मादकता असते याचा अनुभव कुणाला नाहीं ? भावनांना मार्दव आणणें हें ललितकलांचें कार्य. पण गायनामुळें सुप्त, अस्पष्ट, शृंगारिक भावनांना चेतना मिळते, हें कांहीं खोटें नाहीं. कोणत्याही दृश्य वा भावनात्मक सौंदर्याच्या दर्शनानें रसिक माणसाच्या वृत्तींत मधुर खळबळ उठतेच. मग सतरा वर्षांच्या अविवाहित तरुणीचें मन किती कंपनशील असेल तें काय सांगितलें पाहिजे ?

चंद्रा सुंदर, तिचा आवाज सुंदर, ती म्हणत असलेली चीज तर अतिशयच सुंदर. मग गाणें किती सुंदर वठलें असेल याची कल्पना करणेंच बरें. गजरेच्या चित्तवृत्ति अगदीं मधुरतर झाल्या. पार्थिव देहाच्या बंधनांतून आपण मुक्त होत असून, आपलें मन वाऱ्यावर तरंगत तरंगत उच्चत्वाच्या, विलासांच्या, गूढ रम्य वातावरणांत जाऊन पोंचलें आहे आणि अशा या सुखद स्थितींत आपण एकाद्या रूपसंपन्न तरुणाशीं प्रणयचेष्टा करीत आहों असा तिला भास झाला !

चंद्रानें गायन थांबविलें.

कल्पनेच्या रम्य सृष्टींतून गजरा खालीं उतरली. तिनें भीतीनें म्हटलें :

—चंद्रा, मी जातें आतां.

—इतक्यांतच ?

— उद्यां येईन.

—अन् नेहमी येशील ना ?

—येईन, मला आतां दुसरीकडे चैन पडणार नाहीं.

—माझं गाणं आवडलं वाटतं ?

—अन् तूं देखील आवडलीस !

—मी पुरुष असतें तर माझ्या बरोबर लग्न केलं असतंस, नाहीं ?

—चंद्रा.... !

इतकें म्हणून तिनें चंद्रेला मिठी मारली आणि आपल्या प्रणयासक्त मनाचें आपण अशा रीतीनें कोड पुरवीत आहों असें तिला वाटलें !



सातआठ दिवस गेले. दोघींचाही संबंध जास्त दृढ झाला. गजरा चंद्रेकडे नित्य थोडावेळ जाऊन बसूं लागली. तिच्याबरोबर फिरायला जाऊं लागली. आपल्या हृदयांतील गुप्त गोष्टी तिला उघड करून सांगूं लागली; आणि चंद्रेच्या ललितरम्य सहवासांत, तिच्या यौवनाकुल मनाचें समाधान होऊं लागलें. लग्नसमारंभ हा मांगल्याचा, पावित्र्याचा म्हणतात; पण ज्यांच्या भावनांना पावित्र्य आलेलें असतें, त्यांना तो मंगलमय वाटतो. पण ज्यांच्या हृदयांत प्रणयभावनेची आग पेटलेली आहे, यौवनमद असह्य झालेला आहे, अशांना लग्नप्रसंगाचें दृश्य मांगल्याचें वाटणें शक्य आहे काय ? त्यांत शेंसेचा समारंभ !

गजरा त्या दिवशीं सकाळींच चंद्रेच्या शेंसेला गेली. तिचें घर फार सुंदर रीतीनें शृंगारलें होतें आणि मंगलवाद्यें वाजत होतीं. अत्तरसुवासाचा घमघमाट उडाला होता. तरुण कलावंतिणी उंची वस्त्राभरणें लेवून आपल्या चंचलतेनें चमकत होत्या.

उष्णतेमुळें हवा प्रसरण पावते, त्याप्रमाणें गजरेच्या हृदयांत प्रणयभावना प्रसरण पावली व तिच्या वृत्तींना एक प्रकारची मधुर बेहोषता आली.

चंद्रेचें घर तिला सर्वस्वी मोकळें होतें. ती थेट चंद्रेच्या खोलींत आली. चंद्रा मुळचीच सुंदर, त्यांत तिनें आतां साजशृंगार चढविलेला. मग ती किती खुलून दिसली असेल याची कल्पना करा. अस्मानी रंगाचें, जरीच्या किनारीचें रेशमी पातळ, तें नेसण्याची तिची अभिनव पद्धति, अंगावर दोनचार सुवर्ण भूषणें, नवलाईची केशरचना. हें पाहून गजरेला वाटलें, किती सुंदर अन् सुखी आहे चंद्रा ! अन् आज तिची शेंस ... !

गजरा पलंगावर बसली. आज तो पलंग किती सुशोभित दिसत होता ! रेशमी आवरणाच्या गिरद्या ! चौकटीवर जाईच्या माळांचा शृंगार !

—गजरे, आलीस ना तूं शेवटीं ? —चंद्रेनें खोलींत पाय ठेवतांच गजरेकडे पहात आनंदानें म्हटलें.

—आज तुझी शेंस ना ? मग मी न येऊन कसं चालेल ? तूं रागावशील, म्हणून आलें.

—मी आतां कशी दिसतें, सांग पाहूं, गजरा ?

—फार सुंदर ! इथं ये पाहूं ! माझ्याजवळ बैस जरा. तुला डोळे भरून पाहून घेतें.

—हा फोटो पाहिलास, गजरे ? —चंद्रेनें तिच्याकडे एक फोटो देत म्हटलें.

—कुणाचा ग हा ?

—आज माझ्याकडे येणार आहेत ना, त्यांचा ...

गजरेनें आपले स्निग्ध व मोहदग्ध डोळे चंद्रेकडे लावले व निःश्वास टाकला !

—गजरे, अशी अधीर होऊं नकोस...

—काय करावं तें समजत नाहीं...

—मी सांगतें...

—माझं मन... ! मी दुर्दैवी होणार !

चंद्रेनें तिला जवळ ओढली व भावनातिरेकानें तिच्या गालांचें चुंबन घेतलें.

आणि, गजरेच्या अंगांत विजेची चमक उत्पन्न झाली व त्या दाहा-मुळें आपल्या कौमार्याचे बंध तटातट तुटत आहेत असें तिला वाटलें !



दीड वर्षापूर्वीचा हा प्रसंग ! आणि आज मला कळतें कीं, गजरेचें पाऊल ... !

२१-२-३३

कल्पवृक्षांच्या छायेंत
प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई

*

# अंतःसौंदर्य

पेटीवर वांकडातिकडा हात फिरवीत लीला कांहींतरी गुणगुणत होती. मी दृष्टीस पडतांच ती दचकून उठली. तिचा चेहरा लज्जान्वित झाला. तिनें भिंतीकडे वळून पदराचें टोंक गुंडाळायला सुरवात केली.

मी कपडे काढून तिच्याजवळ गेलों. तिच्या हाताला धरून तिला सतरंजीवर बसविलें व हनुवटीला धरून तिचा चेहरा माझ्याकडे वळवीत म्हटलें:

—गायचं कां बंद केलंस ? म्हण ना ?

—मला नाहीं येत.

—मग काय गात होतीस ?

—कांहीं नाहीं.

—मी शिकवूं कां तुला ?

—हं.

पेटीवरून बोटें फिरवीत मी गाऊं लागलों. पण ती गप्पच. म्हणून मी म्हटलें:

—गा ना ?

—लोक ऐकतील. अन् माझा आवाज किती वाईट ! तुम्हांला ऐकवणार नाहीं माझं गाणं—पण हें सांगतांना तिचा गळा दाटून आला. तिचे डोळे पाण्यानें डबडबले.

मी पद म्हणूं लागलों. तिला आवाज नव्हता, गाण्याचें ज्ञान नव्हतें, सुलभ संस्करणशील अशी वृत्ति नव्हती. पण माझें गाणें ती मोठ्या प्रेमानें, तन्मयतेनें ऐकत होती. तुम्ही परिपूर्ण, सर्वज्ञ, आणि मी अपूर्ण, अज्ञान, तुम्हांला न शोभणारी आहें अशा अर्थाच्या नजरेनें ती माझ्याकडे पहात होती, आणि घटकेघटकेला बारीक निःश्वास टाकीत होती !

मी गात होतों खरा. परंतु तिच्या निःश्वासांतून निघणारा अर्थ माझें मन व्यापून टाकीत होता.

लीला सुरूप नव्हती. कुरूपही नव्हती. पण नटवी, लाघवी, काव्यमय नव्हती. तिला कोणतीच कला येत नव्हती. मला चांगलें गातां येत होतें. तिला मुळींच येत नव्हतें. तिचा आवाज देखील घोगरा होता. तिच्या चेहऱ्यावर माझ्या दृष्टीनें आकर्षक असें कांहींच नव्हतें. तिचा देह कांहींसा ठेंगू व लठ्ठ होता. डोळ्यांत प्रेमळ कारुण्याची झांक होती. पण ती देखील बारीक निरीक्षण करावें, तेव्हांच लक्ष्यांत येई. बोलण्यांत, चालण्यांत, प्रत्येक कृतींत सौंदर्यशुन्यताच दिसून येई.

आपल्या या उणीवेची जाणीव तिला सुरवातीपासूनच जाचक होऊं लागली. मी कविता करणारा, गायनवादन जाणणारा, सुस्वरूप, कलावंत नवरा होतों. माझें जीवन आपल्या सान्निध्यानें आपण शुष्क, नीरस बनवीत नाहीं ना अशा भीतीनेंच जणूं काय ती वागत होती. मला अनुरूप अशी पत्नी मिळाली नाहीं, हें मी कधीं कुणाजवळ बोललों नव्हतों. पण तिनेंच आपल्या कृतीनें तें सूचित केलें होतें.

मी पेटी बाजूला सारली व तिला जवळ ओढली. मला तिची [illegible] आली. आपल्या कनिष्टपणाच्या जाणीवेनें क्षणाक्षणाला मनांत [illegible]

जाणारी ही भावनाप्रधान वेडी पोर अशीच नेहमीं दुःखी राहील का? असल्या गोष्टी मनाला लावून घेतल्या तर संसारांत सुख लाभणें शक्य आहे का? नवऱ्याच्या गुणांच्या मापानें बायकोनें आपली किंमत कां ठरवावी? हृदयांतील उच्च, नाजुक भावना ही काय कमी दैवी देणगी?

तिच्या मनांत काय चाललें आहे हें मला न कळल्याप्रमाणेंच मी राहिलों. कारण तशा अर्थाचा एकच शब्द मी तिला विचारला असता तर ती स्फुंदस्फुंदून रडली असती. म्हणून, निरनिराळ्या सांसारिक गोष्टींसंबंधीं मी बोलूं लागलों. बोलतां बोलतां ती म्हणाली:

—आमच्या शेजारीं एक सुंदर तरुणी रहायला आली आहे.

—मग ...?

—तिला चांगलं गातां येतं.

—येत असेल.

—मघांशीं ती आमच्याकडे आली होती बसायला.

—हं.

—माझी तिच्याशीं चांगली ओळख झाली अन् मला ती फार आवडली.

—अस्सं?

—अन् मला वाटलं कीं ....

—काय वाटलं तुला? कां थांबलीस तें सांग ना?

—मला वाटलं ... आपली तिच्याशीं ओळख व्हावी—हें बोलतांना लीला कितीतरी लाजली.

—मला तिच्या ओळखीची काय गरज?

—आपण गाणारे, वाजवणारे. तिला दिखील गातां येतं ...

—जगांत गाणारे काय थोडे आहेत? मला काय त्यांची पर्वा?—मी कृत्रीम उदासीनतेनं बोलत होतों.

—मला भारी आवडली ती. आपणाला दिखील आवडल्याशिवाय राहणार नाहीं, इतकी चांगली आहे ती.

शेजारच्या घरांतून गाण्याचे स्वर मला ऐकूं येत होते. आवाज फार गोड, झारदार. मी तल्लीन झालों. लीला माझ्याकडे प्रफुल्लित चेहऱ्यानें पहात होती. एकादें सत्कृत्य केल्याचें समाधान, त्याग केल्याची विजयी भावना, तिच्या त्या शांत नजरेंत चमकत होती. पण हें आश्चर्यच नव्हे का ? त्या तरुणीचा लीलेला हेवा वाटायला नको होता का ? माझें मन ओढून घेऊं शकणारी ती तरुणी लीलेच्या तिरस्काराला पात्र व्हायला नको होती का ? आपल्या अंगांतील उणीवेची उत्कट रीतीनें जाणीव करून देणारी व नवऱ्याच्या प्रेमांत दोष उत्पन्न करणारी ती अज्ञात बालिका लीलेला इतकी स्वागतार्ह, इतकी आदरणीय कां वाटावी ?

दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं मी घरीं परतलों तेव्हां माझ्या खोलींत लीला एका तरुणीशीं बोलत बसलेली मला दिसली. त्या दोघीही प्रथम दचकल्या, भांबावल्या आणि चटकन् उभ्या राहून एकमेकांकडे पाहूं लागल्या. मी लीलेकडे पहात म्हटलें:

—गायनाची पूर्व तयारी चालली आहे वाटतं ?

—इश्श ! कांहीं तरीच.

—म्हणजे तूं गात नाहींस ?

—माझी थट्टा चाललीय् वाटतं ?

—गुरु देखील मिळविलास शेवटीं.

त्या तरुणीनें लीलेकडे हास्यपूर्ण चेहऱ्यानें प्रेमळ कटाक्ष फेंकला. लीलेनें तिला बसायला आग्रह केला. तेव्हां ती लीलेसमोर सतरंजीवरच बसली.

दोघांनाही एकत्र पाहून माझ्या मनांत किनीतरी विचार येऊन गेले. ती तरुणी लीलेच्या उलट होती. दोघींतही प्रत्येक बाबतींत कितीतरी अंतर होतें. ती फार सुंदर होती. चौदा वर्षें पुरीं झालीं असतील नसतील. तारुण्यानें नुकतीच कुठें आपली वस्ती तिच्या अवयवांत केली होती. तिच्या हनुवटीला खोल खळी होती. तिचे डोळे काळेभोर, पाणीदार, भेदक होते आणि काळ्याभोर रेखीव भुंवयांनीं तिच्या चेहऱ्याला एक प्रकारचा मादक आकर्षकपणा आला होता.

तिचें हंसणें, बसणें, पहाणें, सगळेंच किती मोहक होतें! आणि अशा या घातक तरुणीला लीला आपल्या नवऱ्यापुढें आणीत होती!

—कालचं गायन आवडलं नव्हतं का आपल्याला? हीच गात होती तें गाणं.

— फार सुंदर गातात या. कालच आल्या वाटतं?

—हो. आपल्या मामांच्याकडे उतरल्या आहेत.

—नागेशरावांच्याकडे का?

—हो—त्या तरुणीनें म्हटलें.

—घर कुठं तुमचं?

—सांखळीला. कामतींच्याकडे...

—गायनाचं शिक्षण कुठं झालं?

—तिथंच. बाबांनीं मुद्दाम गवई ठेवून शिकवलं मला. त्यांना गायनाचा फार नाद.

—आणि हें पाहिलंत का, हिला येत नाहीं असं कांहीं नाहीं. वीणकाम, भरतकाम करण्यांत ही फार तरबेज. झाडावर चढणं, पोहणं, बंदुक मारणं दिखील शिकवलं आहे तिला—लीला तिच्या एकेक गुणाची तारीफ करीत होती. मी आनंदानें ऐकत होतों. ती तरुणी लाजून गेली होती.

—अन् इतक्या कला हिच्या अंगीं आहेत म्हणूनच तिला अनुरूप नवरा अजून मिळत नाहीं. नवरा चांगला मिळावा म्हणून मुलींना शिकवतात. पण हिच्या बाबतींत उलटी तऱ्हा.

—आज गाणं नाहीं म्हणत?—मी त्या तरुणीकडे पहात म्हटलें.

—इथं नाहीं.

—मग कुठं? घरीं का?

—हो.

मी तिच्याशीं बोलत होतों तेव्हां लीलेचा चेहेरा प्रफुल्ल दिसत होता. लग्न झाल्यादिवसापासून मी तिला इतकी आनंदी कधींच पाहिली नव्हती. आपल्या आयुष्यांतील अत्यंत महत्वाच्या आशा फळाला येत असल्याप्रमाणें तिची मुद्रा चमकत होती.

नंतर तीं दोघेंही खालीं आलीं. माझें मन गोंधळांत पडलें. लीला! किती वेडी पोर!

नंतर कांहीं दिवसपर्यंत मी घरीं येऊन बसलों म्हणजे ठराविक वेळीं शेजारच्या घरांतून गायनाच्या स्वरलहरी उठूं लागत. आणि त्यावेळीं लीला माझ्याजवळ बसून राही. पण तिचें सान्निध्य मला त्यावेळीं जाणवतच नसे. कारण त्या तरुणीच्या गायनांत मला दर दिवशीं वेगवेगळी गोडी आढळून येई. त्या कांहीं घटका कशा निघून जात हें मला कांहीं समजत नसे. पौर्णिमेच्या उन्मादक चांदण्यांत एका विस्तीर्ण वृक्षाला टांगलेल्या हिंदोळ्यावर बसून झोके घ्यावे म्हणजे आपल्या पार्थिव देहाच्या बंधनांतून आपला जीव मुक्त होत असून उच्च वातावरणांत तरंगत असल्याचा विभ्रम मनुष्याला व्हावा, तसें मला वाटत होतें.

पण एक दिवस सकाळींच ती तरुणी आमच्याकडे आली. तिची मुद्रा घाबरलेली दिसत होती. आपल्या सौंदर्यप्रसाधनांत तिनें आज मुळींच काळजी घेतली नव्हती. ती घाईघाईनें आंत गेली. लीला घरकामांत गढून गेली होती. आपल्या नव्या मैत्रिणीला अशा स्थितींत पहातांच लीला भ्याली. तिनें विचारलें:

—काय ग, अशी कां दिसतेस तूं आज?

—मी आतां घरीं जातें.

—कुठं? सांखळीला का?

—हो. आई आजारी आहे. बावांनीं मला आणण्याकरतां मुद्दाम मोटार पाठवली आहे. मी आतां जातें—तिनें गद्गद स्वरांत म्हटलें.

लीलेचे डोळे पाण्यानें भरून आले. तिनें तारेला जवळ ओढून तिच्या पाठीवरून हात फिरविला आणि भावनांचा पहिला आवेग ओसरल्यानंतर म्हटलें.

—मग जातेस ना तूं? आतां केव्हां येशील? तुझे उपकार मी कधींच विसरणार नाहीं.

—वहिनी, असं काय बोलतां आपण ?

आणि तारा निघून गेली. जातांना तिनं माझ्याकडे पाहिलं. ती नजर, कारुण्यानें भरलेली, स्नेहभावानें उजळलेली ती नजर मी कधींतरी विसरेन का ?



वरील प्रसंगानंतरचे कांहीं दिवस मला अत्यंत उदासवाणे गेले आयुष्याबद्दलची वेगळीच अपेक्षा तारेनें माझ्या मनांत उत्पन्न केली आणि ती मात्र निघून गेली.

मी पूर्वी सुखी होतों. पण आतां ती गेल्यानंतर मला सुखाची उणीव भासूं लागली. तिचें तें सांसारिक आयुष्याचा विसर पाडणारें गाणें मला आतां कोण ऐकवील ? तिची ती मोहक मूर्ति मला फिरून दिसेल काय ?

तिच्या नेहमींच्या गाण्याच्यावेळीं मीं पलंगावर पडलों होतों. मनांत तिच्या संबंधीं विचार घोळत होते. तिच्या तुलनेनें लीलेचा सहवास मला नीरस वाटूं लागला होता.

इतक्यांत लीला माझ्याजवळ आली व पलंगाला टेकून उभी राहिली. कोणत्यातरी आत्यंतिक दुःखानें ती गुदमरत आहेसें मला वाटलें. मी तिला विचारलें:

—काय झालं ?

तिला हुंदके आवरेनात. आपले ओठ घट्ट आवळून ती रडें दाबीत होती. शेवटीं दुःखाच्या आवेगांत तिनें म्हटलें:

—आपल्याला हवं असलेलं सुख देणं माझ्या नशिबीं नाहीं. पण माझ्या मैत्रिणीकडूनसुद्धां तें सुख आपल्याला देवविणं माझ्या नशिबीं नाहीं. तारा वारली !

आणि तिच्या नेत्रांतून अश्रू वाहूं लागले. त्या अश्रूंत त्यागाचें परमोच्च स्वरूप मला दिसून आलें ! मी भावनावश होऊन म्हटलें:

—लिली ! तूं देवता आहेस ! असल्या शेंकडों तारांचें संगीत तुझ्या या मूक संगीतापुढं फिक्कं पडेल.

तिनें आपलें मस्तक माझ्या हृदयावर ठेवलें व आपली असहाय्य नजर माझ्याकडे लावली. तिच्या केंसावरून हात ओढतांना माझ्या मनांत विचार आला: 'हृदयाचें हें सौंदर्य आपण कठोरपणानें पायदळीं तुडवीत आलों.'

९-१०-१९३४.

कल्पवृक्षांच्या छायेंत
प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई

# चांडाळ !

वासू आणि ओंवळ! लोकांच्या दृष्टीनें त्यांचा संसार सुखांत चालला होता.

आणि खरोखर त्यांचें आयुष्य सुख व समाधान यांनीं शिगोशीग भरलेलें होतें. जणूं काय, त्या कुळागारांत वाहणारा पाण्याचा प्रसन्न पाटच. त्यांतील पाणी नेहमीं स्वच्छ, शीतळ, निसर्गानें जसें दिलें तसें. नेहमीं आनंदानें हंसणारें, उडणारें. तसेंच त्यांचें आयुष्य. चिंतेची छाया नाहीं, दुःखाचे ढग नाहींत. साधें, प्रसन्न, चिंतारहीत. एरवीं गरीब, पण पैशांची गरज नाहीं. मग श्रीमंतीसाठीं तीं कां धडपडतील ? वैभवाचा मोह त्यांना कधीं शिवला नाहीं. कारण, वैभव नसलें तर आयुष्य नीरस होतें, हें त्यांना अजून कळलें नव्हतें. पांखरांना कधीं पैशांची गरज भासली आहे काय? रानारानांतून हिंडणाऱ्या हरि-

णांना सोन्याचांदीचा मोह कधीं पडला आहे काय? पण हें जगच असें कीं, हरीण बागडतात, तेथें पारधी फांस मांडून बसतात आणि त्यांचा नाश करतात!

तें कुळागार हें त्यांचें राज्य. त्याची निगा करणें हें त्या रानवट जोडप्याचें काम. नागवेली लावाव्या, त्यांना पाणी देऊन त्या वाढवाव्या, नंतर पानें खुडून तीं विकावीं, पोफळीच्या झाडांना शिंपणें घालावें, शेणखत द्यावें, हंगाम झाला म्हणजे पिवळीं पिवळीं शिपटीं काढून त्यांचीं पोफळें वेगळीं करावीं, तीं सोलून काढावीं, उकडून वाळत टाकावीं, आणि नंतर तीं दुकानदाराला देऊन बदली पाहिजे तो जिन्नस विकत आणून खुशाल आनंदांत दिवस काढावे, हा त्यांचा क्रम.

आणि तें कुळागार तरी किती सुंदर होतें! टेंकडीच्या पायथ्याशीं कुळागाराला सुरुवात झाली होती आणि वरपर्यंत तें चढत आलें होतें. जणूं काय एखादा प्रचंड जिनाच. आठ दहा हात रुंदीच्या पायऱ्यांवजा लांबच लांब पट्टया व त्यांत दोन ओळींनीं पोफळीचीं झाडें लावलेलीं. मध्यें केळी व नागवेली यांची लागवड केली होती व मध्येंच एखादा आंबा, फणस किंवा चांफा त्या नाजूक पोफळींना धीर देण्याकरितां उभा होता. वरच्या पट्टींत उभें राहून खालीं नजर फेंकली म्हणजे मोठें मजेदार दृश्य दिसून येई. माथ्यावर त्यांचें लहानसें घर होतें आणि घराच्या अंगणांत पपनसांचीं झाडें लावलीं होतीं.

ओंवळ आतां पोफळींनां शिंपणें घालीत होती. पाटाच्या कडेला उभी राहून, शरीराला बांक देऊन हातांतल्या "कल्ल्या"नें पोफळींच्या मुळांवर ती मोठ्या मजेदार रीतीनें पाण्याचे फवारे टाकीत होती. कांहीं वेळ एका जागीं राहून शिंपणें झालें म्हणजे दुसरीकडे फिरून तसेंच करायचें, हा तिचा क्रम चालला होता.

सभोंवतालच्या निसर्गाप्रमाणेंच तिचा देह व तिचा स्वभाव बनला होता. इतर कामकऱ्या बायांप्रमाणें ती काळी नव्हती. कारण, उन्हाळ्यांतील रखरखीत दिवसांत देखील सावलीचा गारवा तेथें अखंड प्रतीत

होत होता. इतर उच्चवर्णीय स्त्रियांप्रमाणें तिनें आपला सबंध देह लुगड्यांत गुंडाळला नव्हता. एकपदरी पिवळें लहानसें वस्त्र ती नेसली होती. पण त्याचादेखील तिनें घट्ट कांचा मारला होता. वक्षःस्थलाचा वरचा अर्धा भाग व पाठ उघडीच होती. कारण, आपल्या पद्धतीप्रमाणें तिनें अंगांत चोळी घातली नव्हती व नेसलेल्या वस्त्राचा एक पदर वक्षःस्थळाच्या अर्ध्या भागापर्यंत घेऊन, पाठीमागें आणून, विचित्र पद्धतीनें बांधला होता. गळ्यांत काळ्या-निळ्या पोतांच्या गळसऱ्या घातल्या होत्या, हातांत पितळेचे वाळे घातले होते. कानाच्या पाळ्यांच्या भोंकांतून मोठमोठीं ओबडधोबड भूषणें लोंबत होतीं. नाकांत सोन्याचा दांडा लटकत होता. वक्षःस्थलाच्या अर्ध्याभागावरून नेलेला पदर इतका करकचून बांधला होता कीं, त्यामुळें तें स्पष्ट उठून दिसत होतें. माथ्याचे केंस निगा नसल्यामुळें अस्ताव्यस्त होऊन उडत होते. कपाळाला तांबड्या ओल्या कुंकवाचा पट्टा न रेखतां लावला होता. थोडक्यांत, सौंदर्य म्हणजे काय याची तिला जाणीव नव्हती आणि त्याचं साधन कसें करायचें हें तर तिला मुळींच माहीत नव्हतें. पण मूळ सौंदर्यच जेथें आकर्षक, तेथें इतर साधनांचा अभाव असला तरी तें लपून कसें रहाणार? तळ्यांत उत्पन्न होणारीं साळकें पानांच्यामध्येंच चांगलीं शोभत नाहींत काय? पाण्याचा पृष्ठभागच त्यांना शोभादायक होत नाहीं काय?

पोफळींना पाणी देण्याचें काम बराच वेळपर्यंत चाललें होतें. तसें पाहिलें तर काम रुक्षच. पण तिला तें तसें वाटत नव्हतें, हें तिच्या आनंदी, प्रफुल्ल मुद्रेवरून दिसत होतें. हातांतल्या कामाशीं माणूस तद्रुप झालें, म्हणजे डोळ्यांत जें एक नाजुक, गोड पाणी खेळतें त्याला दुसरी कसली उपमा देणार? जीवितांत कोणतेंच दुःखस्थान नसलें, हृदयांचीं सुखस्वप्नें नेहमीं फळाला येत असलेलीं दिसलीं, जगाशीं संबंध अगदींच कमी आल्यामुळें त्याचा दुष्टपणा अज्ञात असला, आणि फळाफुलांच्या, झाडांच्या व पाण्याच्या तरल निःश्वासांत, निरागस सान्निध्यांत असलें, म्हणजे मनुष्याचें मन किती आनंदी

असूं शकतें, हें आम्हांस कसें समजणार ? तें कळायला ओंवळाची मुद्राच पाहिली पाहिजे.

तिच्या फिक्कट गोऱ्या पाठीवर घर्मबिंदु चमकत होते. पण तिचें शिंपणें चालूच होतें. इतक्यांत कुठून तरी आवाज आला :

—ओंवळ ! ओंवळ !

ओंवळानें शिंपणें बंद करून आसपास पाहिलें व ' ओ ' दिली.

—ओंवळ, इकडे ये पाहूं...

आवाज तिच्या नवऱ्याचा होता. वासू चांफ्याच्या वृक्षावर चढून फुलें झडवीत होता. जमिनीवर चांफ्यांची रास पडली होती. कांहीं फुलें पाण्याच्या पाटांत पडलीं होतीं, कांहीं हिरवळीवर पडलीं होतीं, कांहीं केळीच्या पानांवर अलगद राहिलीं होतीं. आसपास पिवळेंच दिसत होतें आणि चांफ्यांचा गोड सुवास त्या शीतल वातावरणांत भरून राहिला होता.

ओंवळ झाडाखालीं गेली. तिनें वर पाहिलें. पानांच्या गर्दीमुळें तिचा नवरा दिसत नव्हता. तिनें म्हटलें :

—टोपली घेऊन येऊं का मी ?

—आण तर. अन् झटकन् भरून घे सगळीं फुलें.

ती घराकडे धांवली आणि थोड्या वेळानें टोपली घेऊन येऊन ती फुलें गोळा करूं लागली.

—वासू ! कशीं विकलींस काल हीं फुलें ?

—पैशाला दहा. एक रुपया मिळाला काल.

—आज जास्त मिळेल.

—नाहीं. आज सगळीं फुलें विकतां येणार नाहींत.

—कां ?

—धन्याकडे अर्धी पोंचविलीं पाहिजेत.

—त्यांनीं सांगून पाठविलें आहे वाटतें ?

—गेल्या महिन्यांत थोरले धनी वारले अन् आतां घरचा कारभार धाकट्या धन्याच्या हातांत आला ना ? ते इथं नव्हते. मुंबईला होते.

गेल्या दिवसांत आले आहेत ते इथं. आज त्यांच्याकडे कांहीं दिनकार्य आहे. म्हणून फुलें आणायला सांगितलीं त्यांनीं.

ओंवळानें आपल्या साध्या, सोज्वल नजरेनें वासूकडे पहात म्हटलें:

— मग तूं नेऊन देतोस ना तिकडे फुलें?

— तूंच ने तिकडे फुलें. नव्या धन्यांना पाहिलें आहेस का तूं?

— मी गेलें नाहीं या दिवसांत तिकडे.

— फार चांगले आहेत नवीन धनीसाहेब.

— अस्सें?

— धनी चांगले असले तर आम्हांला कुळागाराचें उत्पन्न सुखानें खायला मिळतें. धन्याची संमती आहे म्हणून हीं चांफीं विकायला मिळतात.

— इतके चांगले आहेत का लहानगे धनी?

— तें काय विचारतेस? अगदीं साधे, उदार. कुणाहि बरोबर तास-न्‌तास बोलत बसतात. त्यांची मर्जी राखली पाहिजे आम्हीं.

— अस्सें?

— हो तर. त्यांचा शब्द खालीं पडूं देतां उपयोगी नाहीं. नोकर चाकर त्यांना फार भितात. खूष झाले तर काय देतील अन् काय नाहीं. अन् रागावले तर घरांतून बाहेर काढायला कमी करणार नाहींत. मी नसलों अन् ते इकडे फिरकले तर त्यांना बसायला सांगायचें अं? अन् माडाचीं कोंवळीं शहाळीं काढून त्याचें पाणी द्यायला विसरूं नकोस त्यांना. जातांना ओंवळाच्या फुलांचा गजरा हातांत दे त्यांच्या.

फुलांनीं भरलेली टोपली घेऊन ती घराकडे आली. अर्धीं फुलें दुसऱ्या टोपलींत घातलीं, थोडा वेळ विश्रांती घेतली, चंची सोडून पान खाल्लें. घाम आला होता म्हणून तोंड धुतलें. वस्त्र भिजलें होतें म्हणून दुसरें बदललें. धनी आपल्याशीं दोन शब्द बोलेल म्हणून केंसावरून फणी ओढली आणि तीं सोनचांफीं पोंचवण्याकरतां म्हणून ती धन्याच्या घराकडे जाऊं लागली. पण सौंदर्याची मुळींसुद्धां जाणीव नसलेली ती अडाणी, रानवट, खेड्वळ तरुणी किती तरी सुंदर दिसत होती!

ओंवळ धन्याच्या वाड्यांत गेली व फुलांची टोपली सदरेवर ठेवून ती चौकीवर उभी राहिली. आपल्याला धनीसाहेब पहायला मिळावे व त्यांनीं आपल्याशीं दोन शब्द बोलावे ही तिची इच्छा होतीच. मोठ्या माण-सांनीं आपली चौकशी करावी, आपल्याकडे तोंडभर बोलावें, हें कुणाला नको असतें ? त्यांतून ओंवळ तर अडाणीच. त्या लोकांना बामण म्हणजे पूज्य !

वसंत बाहेर आला. त्यानें ओंवळाला पाहिलें. त्याची नजर उत्सुक-तेनें, आश्चर्यानें तिच्याकडेच खिळली. गावढ्याची बायको अन् इतकी सुंदर ! त्याच्या डोळ्यांना तिची देहयष्टि, तिचें रूप, तिचे भाव फार आकर्षक वाटले. तिच्या त्या उन्नत, विवस्त्र वक्षःस्थलावर गांवकऱ्यांची नजर क्वचित्च स्थिरावली असेल. तिच्या नजरेंतील गोड साधेपणाचा मोह त्यांना क्वचित्च पडला असेल. पोटाकरतां ज्यांना काबाडकष्ट करावे लागतात, त्यांना सौंदर्याची काय किंमत ? त्यांच्या आयुष्यांत सौंदर्याला कसचें स्थान ?...

पण वसंत रसिक, रंगेल, काव्यप्रिय तरुण होता. तो कविता करी, गोष्टी वाची, कादंबऱ्यांतील कल्पित जगांत बुडून जाई. त्याची दृष्टि व्यवहारापासून, जगापासून, बरीच उंच वावरत होती आणि फाजील काव्यात्मतेमुळें, रोगट भावनांचें पूट त्याच्या मनावर चढल्यामुळें, जगां-तील वस्तु त्याला वास्तव स्वरूपांत न दिसतां वेगळ्याच स्वरूपांत दिसत असत.

—कुणाला शोधतेस ? —त्यानें ओंवळला विचारलें.

—चांफीं आणलीं होतीं आपल्याकडे...

—कुठून आलीस तूं ?

—आपल्या कुळागारांतून.

—वासूनें पाठविली का तुला ? मी काल सांगितलें होतें त्याला चांफीं पाठवून द्यायला. फार बरें केलेंस तूं. वासू घरीं नाहीं का ?

—बाजारांत गेला आहे.

—मी आज येईन कुळागार पहायला.

—या ना.

—जरा थांब अं...

तो आंत गेला व रुप्याची अधेली आणून त्यानें तिच्या हातावर ठेवली. पण तिनें लगेच ती जमिनीवर ठेवीत म्हटलें:

—हें नाहीं घेत मी. वासू बोलेल मला. विकायला नाहीं आणलीं मी हीं चांफीं...

—हें पहा. तूं वासूकडे नेऊन दे हे पैसे. उचल ही अधेली.

ओंवळानें त्याच्याकडे कुतुहलानें, आश्चर्यानें, आदरानें पहात पैसे उचलले. वसंताच्या शब्दांचा, त्याच्या औदार्याचा तिच्या मनावर फार परिणाम झाला. लोकांच्या रूपाकडे तिनें फारसें कधीं लक्ष्य दिलें नव्हतें. पण वसंताचा नखरेबाज पोषाक, त्याचे मागें वळविलेले तुकतुकीत लांब केंस, त्याचा सतेज चेहरा, श्रीमंतीची जाणीव न बाळगतां, बोलण्यांत दिसणारा साधा सरळ भाव इत्यादि गोष्टींमुळें, धाकटे धनीसाहेब तिला मनापासून आवडले.

—मी येतें अं ?—तिनें नम्रपणें म्हटलें व रिकामी टोपली उचलून ती परत फिरूं लागली. इतक्यांत वसंतानें हंसतच म्हटलें:

—मी देखील येईन तुमच्याकडे आज.

ती गेली आणि वसंताची कल्पनाशक्ति काम करूं लागली.

ती जातीनें गावडी....पण इतकी सुंदर...तिचा नवरा वासू किती कुरूप...! अन् अडाणी...! त्याला हिच्या सौंदर्याचें काय चीज करतां येईल ? हिच्या कष्टावरूनच तो हिची किंमत करणार ! हिच्या नजरेंतील गोडवा त्याला नेहमींच अज्ञात राहील...हिच्या अवयवांतील तारुण्य त्याला केव्हांच लोभनीय वाटत नसेल...दिवसभर तो हिला कुळागारांत राबवीत असेल. कदाचित् आडदांडपणानें वागवीत असेल, हिच्या आवडीकडे दुर्लक्ष करून तो हिला छळीत असेल !...

...आणि ही सुखी असेल का ? तें शक्य नाहीं. इतकी सुंदर, इतकी प्रेमळ तरुणी त्या अडाणी नवऱ्याच्या सहवासांत काय सुखी होणार ? आपल्याला अनुरूप अशा नवऱ्याची इच्छा तिच्या हृदयांत खात्रीनें

असेल. तरुण रसिक नवऱ्याची उणीव तिला कधीं कधीं भासत असलीच पाहिजे...माझ्याकडे ती किती आनंदानें बोलत होती...! तिचें मन फार नाजूक, चंचल, रसिक असलें पाहिजे.

ओंवळासंबंधीं वेगवेगळ्या कल्पना चालवून तो तळमळूं लागला. स्त्रीसौंदर्य ही उपभोगाची वस्तु आहे, या त्याच्या विकृत विचारसरणी-मुळेंच त्याला ओंवळाचें आयुष्य व्यर्थ होय असें वाटत होतें. आयुष्यांत देहसौंदर्याला अगदींच गौण स्थान आहे, सुस्वरूप स्त्रीला आपल्या सौंदर्याची फाजील जाणीव व अभिमान नसला म्हणजे कुरूप नवऱ्याच्या सहवासांत देखील ती सुखी राहूं शकते ही वस्तुस्थिति त्याला माहीत नव्हती. यामुळें ओंवळ अत्यंत सुखी असूनहि त्याला ती अत्यंत दुःखी आहे असें वाटलें व तिला सुखी करण्याची जबाबदारी आपल्यावर आहे अशीहि त्यानें आपल्या मनाची समजूत करून घेतली.

ओंवळ नाजुक, सुंदर, तारुण्यानें रसरसलेली. तिचा नवरा चाळिशीच्या घरांत गेलेला—कुरूप, काळा, अडाणी. अशा विषम नवऱ्यापासून तिला सुख लाभणें शक्य नाहीं. आपण तरुण, श्रीमंत, सुंदर आहों. तिच्या मनाची कळी आपण खुलविली, तिला रसिकतेचें, उपभोगाचें नवेंच जग दाखवून दिलें, प्रेमाची फुंकर घालून मायेच्या उष्णतेनें तिच्या हृदयाची पालवी फुलविली,...तर तो गुन्हा होईल काय? खचित नाहीं. कारण, आपला हेतु केवळ स्वार्थी नाहीं... केवळ तिच्या सुखाचा प्रश्न...

आणि आपल्या स्वार्थी, वैषयिक, उन्मादपूर्ण दृष्टीवर परसुखाचें, पर-हिताचें आवरण चढवून तो सायंकाळीं कुळागारांत गेला.

एरवीं कुळागारांत तो क्वचित्च जाई. तो तसा रसिक होता. पण कथाकादंबऱ्यांच्या वाचनानें उत्पन्न झालेली रसिकता ती. निसर्गाच्या प्रत्यक्ष खऱ्याखुऱ्या सौंदर्याकडे त्याचें लक्ष कधींच वेधलें नव्हतें. पण आज नेहमींचेंच कुळागार त्याला काव्यमय दिसलें.

झरीच्या पाण्यांत ओंवळ स्नान करीत होती. धन्याला पहातांच ती प्रथम दचकलीच. पण ती लज्जेनें नव्हे. लाजण्याचे संस्कार तिच्यावर

झालेलेच नव्हते. तिच्या जातींतील स्त्रियांना नैतिक बंधनांची देखील फारशी जाणीव नसते. यामुळें आपले कांहीं अवयव, धनीसाहेबांना स्पष्ट दिसणार ही जाणीव तिला त्रासदायक झाली नाहीं. कारण, ती स्नान करतांना गांवकरी कितीदां तरी येत जात. पण त्यांचें तिकडे लक्षच नसे व तिच्याहि मनांत ती गोष्ट येत नसे.

वसंत मात्र विचलित चित्तानें, केळीच्या आडून तिच्याकडे पहातच होता. तिनें लगबगीनें आंघोळ आटोपली व पाण्यांतून वर सरून ती धन्याकडे पहात म्हणाली :

— इथें उभे कां ? घराकडे जाऊन बसा आमच्या.

— वासू आहे का घरांत ?

— भिरंडीचीं सोलें घेऊन बाजारांत गेला आहे. येईल इतक्यांत.

वसंत ओंवळाच्या मागून तिच्या घराकडे गेला. तिचें घर मातीचें असून तें लहानच होतें. घराला एकही खिडकी नसल्यामुळें आंत अंधार होता. छप्पर पोफळीच्या झावळ्यांचें तयार केलें होतें. बाहेर ओसरी होती व तेथें बसायला मातीचे दोन सोपे तयार केले होते.

तें दरिद्री घर पाहून वसंताला तिच्या स्थितीचा जास्तच कळवळा आला. नाजूक ओंवळ असल्या अंधारांत रहाते हें बरें का ?

ओंवळानें त्यांना बसण्याकरतां सोप्यावर कांबळ अंथरली. एका कवाथ्याचीं दोन शहाळीं काढून आणलीं व शेंड्याकडे फोडून तीं वसंतापुढें ठेवीत म्हटलें :

— शहाळ्यांचें पाणी पितां ना आपण ?

— हो हो. मला शहाळीं फार आवडतात.

पण त्याला तें कुळागार आवडत नव्हतें किंवा शहाळींही आवडत नव्हतीं. ओंवळ मात्र मनापासून आवडली होती.

तिच्या मनांत तिच्या स्थितीबद्दल असंतोष उत्पन्न करण्याचें कार्य त्याला करायचें होतें. त्याकरतां सलगी हवी होती...

पण जिव्हाळा दाखविल्याशिवाय तें कसें शक्य आहे ? म्हणून त्यानें म्हटलें :

—हें आमचें कुळागार केव्हांपासून तुमच्याकडे आहे ?

—आपण धनी. आपणांला माहीत असायचें हें. मी इथें यंदांच आलें. पण मला वाटतें, बऱ्याच वर्षांपासून तें आमच्या घराकडे आहे.

—तुमच्याशिवाय इथें आणखी कोणी खपतें का ?

—आम्हीं दोघेंहि कुळागाराचें सगळें काम करतों. अन् देवाच्या व तुमच्या दयेनें आम्हांला कांहींच उणें पडत नाहीं.

—सुपारीशिवाय आणखी काय उत्पन्न मिळतें इथें ?

—आम्हीं इथें पुष्कळ ज़िन्नस तयार करतों. मिरीं, नागवेलीचीं पानें, केळीं, लिंबू, सोलें...

—अन् तुम्हीं दोघें एवढे कष्ट करतां ?

—हो. काय करणार ? आम्ही दिवसभर खपतों.

—शिवसभर पाण्यांत राबावें लागतें तुम्हांला. अन् इतक्या श्रमानें तूं आजारी पडत नाहींस का ?

—थंडी ताप आलाच तर वासू आहे ना ? बाकी मी आजारी पडतच नाहीं मुळीं. पाण्याची मला संवय झाली आहे.

—दिवसभर त्रास काढणें वाईटच नाहीं का ?

—पण त्रास काढल्याशिवाय कसें होईल ?

—कसें होईल म्हणजे ?

—आम्हांला काय जमिनी आहेत ? काम केलें तर पोटाला मिळायचें—तिच्या मुद्रेवर चिंतेची बारिक रेषा उमटून गेली.

—खरेंच. तुमची स्थिति फारच वाईट आहे. काम केलें तर पोटाला मिळायचें. धन्याची जमीन. ती त्यानें काढली तर पंचाईत. आजार आला तर हाल. पाऊसवारा मोठा आला तर घरकुल मोडून पडायचें. आम्हां बामणांचें असें नाहीं. आमच्या बायका किती सुखी. त्यांची सेवा करायला इतर जातींतल्या बायका तयार. सुंदर पोषाक करायचा. आवडेल तें खायचें, फिरायला जायचें.

—पण तुमच्या कृपेनें आम्ही सुख मानीत आहों.

— कसलें तुझें सुख ? तुझें लग्न केव्हां झालें ?

— गेल्या वर्षी.

— तूं तिसरेपणाची बायको ना ?

— हो.

— तुझें वय किती ?

— राण्याच्या बंडांत माझा जन्म झाला....

— म्हणजे, यंदां तुला पंधरावें वर्ष. अन् वासूचें वय ?

ती गप्पच राहिली. तिच्या साध्या भोळ्या मनाला वेगळाच धक्का बसला. तिला वाटलें, आपण समजत होतों त्यापेक्षां आपली स्थिति वेगळी आहे.... आपण दुःखी आहों.... एखाद्या भाटकाराच्या घरीं पडलें असतें तर....

— तुझें नांव काय ?

— ओंवळ !

— ओंवळ ! तूं कांहीं म्हातारी नाहींस...मला आपलें वाटतें कीं तूं सुखी व्हावीस... कारण आमचें कूळ तूं ... वासू एक म्हातारा झालेला. त्यानें तूं इथें येण्यापूर्वी दोन स्त्रियांशीं संसार केला आहे. तूं नवीन आहेस...तुला आवडी आहेत. जनावराप्रमाणें दिवसभर राबतेस तें एक सोड. पण जनावराप्रमाणें गलिच्छ वागतेस तें बरें का ? तूं बरी दिसतेस, पण तूं नेसलेलें वस्त्र बरें दिसतें का ? किती जाड अन् किती मळकट !

ओंवळ मान खालीं घालून ऐकत होती. धनीसाहेब फार प्रेमळ आहेत. म्हणून ते आपल्याबद्दल इतकी कळकळ दाखवितात. अन् ते म्हणतात तें तरी खोटें आहे का ? खरेंच, आपली स्थिति सगळ्याच बाजूंनीं वाईट नाहीं का ? तिच्या मनांत खळबळ चालली.

आपला नवरा म्हातारा. घर अगदीं लहान अन् काळोखानें भरलेलें. दिवसभर कुळागारांत काबाडकष्ट. यांत कसलें आलें आहे सुख ?

थोड्या वेळानें ओंवळ म्हणाली :

— आम्ही गरीब. चांगलीं लुगडीं आणायला पैसे नकोत का ?

— तुझ्याकडे नसले पैसे तर मी देईन. तूं मला वेगळी आहेस का ?

अडीअडचणीच्या प्रसंगीं आमचे बाबा वासूला पैसे देत नसत का? मी तुला दोन लुगडीं दिलीं तर कुठें बिघडलें?

— पण आपले उपकार आम्ही कसे फेडूं?

— मनांत असलें तर उपकार फेडशील तूं...अन् हें पहा, ओंवळ, तुझ्या गळ्यांत ते चाळीस पन्नास पोतांचे जोड शोभत नाहींत...अन् हातांतलीं तीं पितळेचीं कांकणें...केंसांची निगा राखावी बायको माणसानें, म्हणजे बरें दिसतें...फुलांना इथें तोटा आहे का? तीं माथ्यांत माळ्लीं तर किती शोभा येते? तूं तरुण आहेस, सुंदर आहेस...तुला शोभेल हें सगळें....

धन्याचें बोलणें ती तल्लीनतेनें ऐकत होती. तरुणांच्या बोलण्यांतला, सहवासांतला आनंद तिला लाभत होता. अज्ञान, अडाणी जातींत जन्म. यामुळें नैतिक बंधनांची जाणीव तिला फारशी नव्हती आणि म्हणूनच आपल्या मूळ स्थानापासून आपण च्युत होत आहों कीं काय, हें समजण्याइतकी मानसिक तयारी देखील तिची झाली नव्हती.

— ओंवळ, आईला सांगून आज दोन लुगडीं पाठवून देतों मी. तीं वासूला दाखीव. तो मनुष्य एरवीं साधा आहे. शिवाय, हे पांच रुपये असूं दे तुझ्याजवळ.

— धनीसाहेब, हे कां म्हणून घ्यायचे मी?

— कां? मी तुझा धनी म्हणून! तुझें हित मला हवें आहे, माझ्या कुळांनीं हालांत, गरिबींत दिवस काढावे हें मला नको आहे.

तिला वाटलें, वासू आपला नवरा. आणि धनी आपला मालक. आपणांला सुखाचें जग अज्ञात होतें तें धनीसाहेबांनीं दाखवून दिलें. तिला आपल्या सौंदर्याची, तारुण्याची जाणीव झाली आणि तरुण व सुंदर असूनहि आपणाला कांहींच कसें माहीत नव्हतें याचें तिला आश्चर्य वाटलें.

वसंताच्या बोलण्याचा, पाहण्याचा त्याच्या औदार्याचा खरा हेतु मात्र तिला अजून समजला नव्हता. धनी चांगले आहेत, प्रेमळ आहेत एवढें तिला दिसून आलें आणि कोणत्या तरी रीतीनें धन्यांच्या उपयोगी आपण पडलेंच पाहिजे ही भावना तिच्या हृदयांत उत्पन्न झाली.

धनी जायला उठले, तेव्हां सुरंगीच्या फुलांचा गजरा त्यांच्या हातांत देत तिनें म्हटलें:

—आपल्याला द्यायला आमच्यापाशीं काय आहे?

—हें काय थोडें झालें?—वसंतानें गजऱ्याचा वास घेत म्हटलें.

या शब्दाचा अर्थ तिला कळला का?

सायंकाळीं नवरा परतला तेव्हां तिनें घडलेली हकीगत त्याला सांगितली. तेव्हां तो म्हणाला:

—धनीसाहेब फार प्रेमळ आहेत हें मी सांगितलें नव्हतें का तुला?

—अन् आईला सांगून माझ्याकरितां दोन लुगडीं पाठवून देतों म्हणाले, अन् पांच रुपये दिले माझ्याजवळ.

—फार कनवाळू आहेत ते. देवू त्यांचें बरें करील.

नेहमीं तिचें मन किती शांत, निर्मल होतें. पण आज तिच्या मनाची तळमळ चालली होती. नवऱ्याच्या वाईट रूपाबद्दल, त्याच्या वयाबद्दल वेडेवांकडे विचार तिच्या मनाला केव्हांच शिवले नव्हते. पण आतां त्याचा चेहरा तिला खरोखर विद्रुप दिसूं लागला. त्याचे बाहेर आलेले चार पांच दांत तर तिला फारच किळसवाणे दिसले. त्याची माथ्याची जटा तिला ओंगळ वाटली. आपण त्याला अनुरूप नाहीं, आपलें आयुष्य जास्त सुखांत, जास्त चांगल्या रीतीनें गेलें पाहिजे असें तिला वाटलें आणि आज तिला, पहिल्यांदाच, आपल्या आयुष्यांत किती तरी उणीवा आहेत असें दिसून आलें.

नेहमीं ती पहांटेला उठून कामाला लागे; काम पण थोडें? चार पांच गुरें, घरांतील व्यवस्था, कुळागाराचें शिंपणें. पण हें सगळें ती मोठ्या आनंदानें करी. पण दुसऱ्या दिवशीं तिला वाटलें, अंथरुणावर तसेंच निजून पडावें. इतके काबाडकष्ट कोण करील? मरमर मरायचें अन् कपाळांत सुख नाहीं. त्यापेक्षां सावकाश उठलेलें काय वाईट? तिचें सगळें लक्ष लुगड्यांकडे व धन्याच्या प्रेमळ शब्दांकडे लागलें!

शेवटीं धन्याकडून लुगडीं आलीं! किती सुंदर लुगडीं! तसलीं लुगडीं तिनें जन्मांत कधीं वापरलीं नव्हतीं. किती तलम! किनार पण किती

चांगली ! तिचा आनंद गगनांत मावेना. तिनें तीं हृदयाशीं धरलीं, तोंडाशीं धरलीं, तीं घेऊन ती घरांत गेली, बाहेर आली, इकडे तिकडे कुळागारांत फिरली !

आणि धन्यांनीं केलेल्या सूचनांची आठवण होतांच, तिनें आपले केंस विंचरले, अंबाडा घातला, त्यावर आबोल्यांची वेणी माळली, केळीच्या पानाचा तीर आणून कुंकवाची पट्टी रेखून लावली, गळ्यांतला पोतांचा भार कमी केला, हातांतले मलीन वाळे स्वच्छ केले, नवीन लुगड्याची घडी मोडली आणि तें नेसून झाल्यावर तिनें आपल्या मळकट आरशांत पाहिलें. तेव्हां ती आश्चर्यचकितच झाली ! किती सुंदर ! आपण गावडी कीं...आपल्या धन्याची... !

आणि या विचाराबरोबरच तिच्या मनांत विजेप्रमाणें एक कल्पना चमकून गेली. आणि आनंद, भय, आशा इत्यादि भावनांनीं तिचें मन गोंधळून गेलें !



वसंत कुळागाराच्या निमित्तानें ओंवळाकडे नेहमीं येऊं लागला. आजही तो नेहमीप्रमाणेंच येऊन बसला.

दोघेंही एकमेकांना पाहून हंसलीं. मिटलेली कळी त्यानें खुलविली मग त्याच्याकडे पाहून ती कां हंसणार नाहीं ?

—ओंवळ ! आतां किती चांगली दिसतेस तूं आज ?

—बसा ना !...

तो बसला. ती देखील बसली. पण तिचें पूर्वीचें बसणें किती वेगळें होतें !

—ओंवळ ! खरेंच सांग. तुझ्या नेहमींच्या आयुष्यांत तुला आनंद वाटतो का ?

या प्रश्नानें ओंवळ दचकलीच.

—पूर्वी वाटत होता; आतां नाहीं...

—आतां कां वाटत नाहीं ?

—तुम्हीं काल सांगितलें तें खरें. काम करायला मनच लागत नाहीं.

आज कुळागाराचें शिंपणें अर्धवटच राहिलें. पण काम केल्याशिवाय कसें होईल ?

—वासू दुसऱ्याकडून काम करून घेईल. पैशांची चिंता करूं नकोस तूं.

—पण धनीसाहेब ! असलीं कामें दुसऱ्यानें करायचीं असतात का ?

—काय हरकत आहे दुसऱ्यानें करायला ? पाहिजे तर मी सांगतों वासूला, एखादा गडी ठेव म्हणून. असलीं लुगडीं नेसून कष्ट करायचे नसतात !

ओंवळ स्तब्ध राहिली. तिची मनःस्थिति फार विचित्र झाली. पूर्वीचे स्निग्ध, नाजुक बंध तुटत असून आपण नव्या दृष्टीनें, नव्या जगांत येत आहों असें तिला वाटलें. दुःख व आनंद अशा विरोधी भावनांत ती बुडून गेली.

—ओंवळ ! तुझें घर दाखव पाहूं मला.

—धनीसाहेब ! तुम्ही पहाण्यासारखें नाहीं तें.

—पण, मला पाहिलें पाहिजे. तुमच्या अडचणी मला लक्षांत घेतल्या पाहिजेत.

दोघेंही घरांत आलीं. दोघांचींही हृदयें धडधडत होतीं.

घरांत सगळीकडे अंधार होता !

...गुन्हे, अत्याचार कुठें घडतात ?

अंधारांत !...

आणि तीं दोघेंहि अंधारांत होतीं....



पूर्वीची ओंवळ ! रानवट, खेडवळ तरुणी ! साधीभोळी गावडी ! आपल्या कामांत तल्लीन होणारी, पूर्ण सुखी. आतां तशीच आहे का ती ?

सुंदर लुगडें नेसून ती आतां कष्ट काय करणार ? नवऱ्याचा तिटकारा, कामाकडे दुर्लक्ष्य, आळस आणि......

सायंकाळीं नटून थटून धनीसाहेबांची वाट पहात दारांत बसलेली...

आणि त्यावेळीं बिचारा वासू, दोन दिवसांपूर्वी संसारसुखांत पोहणारा वासू, त्या टेंकडीच्या पलीकडे जाऊन एका दगडावर अश्रु गाळीत बसतो आणि रात्रींचे आठ वाजल्यानंतर, भाताचे गोटे उकडून खाण्याकरतां, चोराप्रमाणें घरांत शिरतो... !

असले चांडाळ... !

४-५-१९३४

कल्पवृक्षांच्या छायेंत
प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई

*

# नवें वर्ष

आंतु अस्वस्थ चित्तानें मेजावर पडलेल्या ढिगांतून आपलीं पत्रें निवडीत होता. पण त्याचें लक्ष आज कामाकडे नव्हतें. पोष्टाचे इतर शिपाई काम करतांना एकमेकांशीं बोलत, हंसत, खिदळत, पत्रांच्या पाकिटांवरील नांवें वांचून कोट्या करीत; पण आंतूचें तिकडे लक्ष नव्हतें. त्याची आजची अंतर्मुख वृत्ति त्याच्या सोबत्यांच्या ध्यानांत यायला उशीर लागला नाहीं. त्यांना संभाषणाला आयताच विषय सांपडला. एकानें म्हटलें: " आंतू, आज बोलत कां नाहींस बाबा ? "

—घरीं बायकोबरोबर भांडला असेल !—दुसऱ्यानें म्हटलें.

—तसं नाहीं व्हायचं. मी त्याच्या बायकोला ओळखतों ना ? ती कधींहि भांडायची नाहीं याच्याशीं. फार चांगली बाई आहे ती. आंतु

आम्हांला नेहमीं इतका आनंदी दिसतो याचें कारण त्याच्या बायकोचा आनंदी आणि प्रेमळ स्वभाव.

—मग आज आंतु इतका उदास कां दिसतो ?

—बिचाऱ्याची बायको बाळंत व्हायची असेल अन् याच्याजवळ पैसे नसतील. आमची जोड ती काय? महिन्याकांठीं बावीस रुपये मिळायचे ! इतक्यानं काय होणार ? कुटुंबाचा चरितार्थ तर चालला पाहिजे ?

आंतु पत्रें निवडण्याचें काम करीत होता. सोबत्यांच्या भाषणाचा त्याला राग मात्र आला नाहीं.

—आंतूला किती मंडळी पोसावी लागते?—पहिला शिपाई अडाणीपणानें म्हणाला.

—बायको आणि चार पोरें इतकी मंडळी काय थोडी झाली ? इतक्यांचा खर्च वीस-बावीस रुपयांत कसा भागणार तें का आम्हांला कळत नाहीं ?

—आंतूच्या मनांत वेगळाच विचार चालला होता. आज पांच वर्षें पोस्टाचा शिपाई म्हणून तो काम करीत होता. एवढ्या या कालांत त्याला आपल्या प्रेमळ बायकोची किंवा लाडक्या मुलांची कोणतीच आवड पुरवितां आली नव्हती. सकाळपासून संध्याकाळपर्यंत सगळा गांव पायाखालीं घालायचा, प्रसंगीं लोकांचीं दुरुत्तरें सहन करायचीं, पण जनावराप्रमाणें पोट भरण्यापलीकडे आपणाला कांहीं करतां येऊं नये याची त्याला खंत वाटत होती. आपली लिंदा किती प्रेमळ, सहनशील व गोड स्वभावाची ! तो पूर्वी दारू पीत होता; पण लिंदेला घरांत आणल्यापासून तिनें त्याला ती सोडायला लाविली होती. घरची गरिबी. पण लिंदा कसलाच हट्ट धरून बसत नव्हती. फार काटकसरीनें ती त्याचा संसार चालवीत असे आणि हें पाहून आंतूला नेहमीं फार वाईट वाटे. पण...

—आंतु !—पोस्टमास्तरनें त्याला हांक मारली.

आंतु दचकला व पोस्टमास्तरनें पुढें केलेलीं दोन रजिस्टरें त्यानें आपल्या किंचित् कांपणाऱ्या हातांत घेतलीं.

पत्रें घेऊन परततांना त्याची नजर त्या लखोट्यांवरील ठळक आंकड्यांकडे गेली व १०० व ५० हे आंकडे त्याला कितीतरी मोठे दिसूं लागले !

आणि लिंदेचा जीर्ण झगा, तिच्या गोंडस हातांतल्या कांचेच्या मळकट बांगड्या, फाटक्या पोषाखांतलीं गोजिरवाणीं मुलें व घरांतील दैन्यदर्शक सामान त्याच्या नजरेपुढून निघून गेलें.

उद्यां नवें वर्ष! शेजारीपाजारी किती आनंदांत असतील! स्त्री-पुरुष परस्परांना मौल्यवान भेटी देतील, मुलाबाळांना नवींनवीं खेळणीं आणतील, पक्वान्नांचीं जेवणें होतील आणि नृत्यगायनांत व चैनींत सगळा दिवस घालवतील! आणि आपण ... ?

या विचाराबरोबर त्याचें मन अधिकच विषण्ण झालें. कसेंही करून उद्यां लिंदेच्या मधुर हातांत आपल्या हातांनीं दोन तरी सोन्याचीं कांकणें चढवावयाचीं, मुलांना नवे कपडे घालायचे आणि त्यांचा आनंद पाहून आपण उद्यांचा दिवस मजेंत घालवायचा...

त्यानें तीं पत्रें खिशांत कोंबलीं व इतर पत्रांनीं भरलेली चामड्याची पिशवी कांखोटीला मारून तो बाहेर पडला.

बरीच वाट चालून झाल्यावर लोकांची ये-जा नाहींशी पाहून त्यानें हळूच तीं पत्रें खिशांतून बाहेर काढलीं, पुन्हा एकदां त्या आंकड्यांकडे पाहिलें व ५० रुपयांच्या पाकिटावरील नांव वाचलें. ती विधवा बाई त्याच्या ओळखीची होती व आफ्रिकेला असलेल्या तिच्या मुलाकडून तिला तें पत्र आलें होतें.

आंतूच्या मनांत चलबिचल झाली. नव्या वर्षाकरितां त्या दूरस्थ मुलानें आपल्या आईला हे पैसे पाठविले असतील व ती मोठ्या आशेनें ह्या पत्राकडे डोळे लावून बसली असेल! आणि आपण...

त्याच वेळीं त्याला वाटलें कीं, लिंदा आपल्या सौम्य, स्निग्ध दृष्टीनें आपणाकडे पहात आहे व आपल्या लहान मुलांकडे बोट दाखवून म्हणत आहे: 'आन्तॉनियु! कसली बुद्धि सुचली ही तुला?'

त्यानें तीं पत्रें खिशांत कोंबलीं व तो चालूं लागला. निरनिराळे

वेडेवांकडे विचार त्याच्या मस्तकांत नाचूं लागले. गांवची इगर्जे जवळ आली व तेथून त्या बाईचें घर दिसूं लागलें.

आंतु तेथेंच थांबला. त्यानें तें रजिस्टर फिरून बाहेर काढलें व आसपास कोणी नाहीं असें पाहून तें फाडण्याकरितां त्याचें टोंक चिमटींत धरलें ...

'घण्‌...' इगर्जीची घंटा जोरानें वाजली.

आंतूनें दचकून वर पाहिलें आणि पत्र खिशांत घालून तो अधो-दृष्टीनें चालूं लागला !

तो घराकडे पोंचला तेव्हां लिंदा त्याची वाट पहात उंबरठ्यावर उभी होती. तिचा चेहरा मूळचाच गोड. पण तो आज अधिकच प्रफुल्ल दिसत होता. डोळ्यांत शांततेचे व सहनशीलतेचे भाव दृग्गोचर होत होते.

तिनें अंगांत साध्या कापडाचा एक आंखुड झगा घातला होता व तिच्या पायांचा खालचा भाग उघडाच होता. तिचे लांब करडे केंस पाठीवर रुळत होते आणि याचमुळें आंतूला ती आज नेहमींपेक्षां अधिक सुंदर दिसली.

आंतूवर नजर पडतांच ती लहान मुलाप्रमाणें उड्या मारीतच त्याच्या-जवळ गेली. त्याच्या हातून चामड्याची पिशवी तिनें काढून घेतली. त्याचा उजवा हात आपल्या दोन्ही हातांनीं दाबून धरून त्याच्या उतरलेल्या चेहऱ्याकडे पहात तिनें म्हटलें : " माझ्या आवडत्या आंतू ! उद्यां नवें वर्ष लागणार अन्‌ तूं असा दुःखी ! काय झालं तुला असं व्हायला ? जास्त श्रम पडले का तुला ? सांग ना ? "

लिंदेची कळकळ पाहून आंतूचें हृदय विरघळलें ! गरीब खरी, पण लिंदा तशी दिसते का ? पण ती खरोखरी आनंदी आहे का ? 'नाहीं ! नाहीं !' त्याचें मन त्याला म्हणूं लागलें.

ती घरांत आली.

त्यानें लिंदेला कुरवाळीत म्हटलें :

— लिंदा, माझ्या लाडके, खरेंच का मी इतका दुःखी दिसतों ?

— तुझा हा चेहरा पाहून मला फार वाईट वाटतें ना ! उद्यां नवें वर्ष

आणि आज मनांत चिंता बाळगायच्या का ? माझीं मुलें आज किती आनंदी आहेत ! शेजारच्या घरांतून उद्यांचा दिवस साजरा करायसाठीं केवढी तयारी चालली आहे ! कागदाचे दिवे केले आहेत, गुढ्या लावल्या आहेत, बायकांनीं 'मांडारे' उन्हांत वाळत टाकले आहेत आणि माझीं बाळें हें सगळें पाहून किती आनंदी दिसत आहेत !

— लिंदा, उद्यां नवें वर्ष अन् आज आमची स्थिति ही अशी ! लोकांची नव्या वर्षासाठीं चाललेली तयारी पाहून आम्ही आणि आमच्या मुलांनीं आनंद मानायचा ! नव्या वर्षानिमित्त तुला कांहींतरी आणावें, मुलांना कपडे शिवून घ्यावे असें मला किती तरी वाटतें ! पण ...

— आंतू, तूं अगदींच वेडा झालास ! — लहान मुलाप्रमाणें त्याच्या केंसांशीं खेळत ती म्हणाली — नव्या वर्षाकरितां द्यायला तुझ्याजवळ कांहींच नाहीं म्हणून दुःख मानावयाचें, कीं नवें वर्ष तुम्हांला सुखाचें जाईल या आशेनें आनंदित असायचें ? भेटी आणल्यात तर आम्हाला नको आहेत का ? मला दोन तीन झग्यांपलीकडे नेसायला काय आहे ? अन् मुलांची देखील पंचाईतच होते. पण तूं तरी कुठून आणशील हें सगळें ? पैसे पुरले पाहिजेत ना ? — लिंदेच्या मधुर आवाजांत कंप उत्पन्न झाला.

इतक्यांत चारही मुलें ओरडत धांवतच आलीं व आंतूला गराडा घालून त्याला नव्या वर्षासंबंधींच्या गोष्टी विचारूं लागलीं.

— पापा, उद्यां मला एक छानदार फणी आण अं ! आठ वर्षांची मिनी म्हणाली.

— पापा ! इगर्जीत जायला बूट हवेत — दुसरी लिझी म्हणाली.

— पापा ! मला चेपें आण अं ! — तिसरा पेद्रू म्हणाला.

आणि चौथा दोन-तीन वर्षांचा मुलगा बोबड्या भाषेंत म्हणाला : " पा–पाऽ ! पा...व..."

मुलांनीं सांगितलेल्या वस्तू अगदीं साध्या होत्या; पण त्या कशा आणायच्या ? आजच आपण तें रजिस्टर फोडायचें व पैसे आणायचे, म्हणजे या वेळीं घरांत किती आनंद दिसला असता ! पण आपलें मन

किती मित्रें ! इगर्जीची घंटा होते काय अन् आपण आपला बेत रहित करतों काय ! त्याच्या मनांत विचार आले आणि लिंदेच्या त्या आंखुड जीर्ण झग्यावर जेव्हां त्याची फिरून नजर गेली, तेव्हां त्यानें मनांत निश्चय केला कीं, उद्यां आपल्या लिंदेला व मुलांना आपण भेटी आणणार आणि त्यामुळें तीं आनंदी होणार ! या विचारानें त्याला किती बरें वाटलें ! या क्षणिक आनंदाच्या भरांत त्यानें मुलांना जवळ ओढून त्यांचीं चुंबनें घेतलीं व शेवटीं लिंदेवरहि तीच पाळी आली !



दुसऱ्या दिवशीं नवें वर्ष सुरू झालें; आंतु नेहमींचाच पोषाक करून कामावर जायला निघाला. तेव्हां लिंदा त्याच्याजवळ येऊन म्हणाली: "आंतॉनियु, आज नवें वर्ष ! आज लवकर यायचं अं ! अन् आनंदी यायचं. तुझ्याकरितां 'मांडारे' तयार करून ठेवतें."

आंतूनें तिच्या खांद्यावर हात ठेवीत व तिच्याकडे प्रेमानें पहात म्हटलें: "लिंदा, तूं किती शहाणी ग ! मला आज तूं काय भेट देशील सांग पाहूं ?" हें बोलतांना त्याच्या हृदयांत सूक्ष्म कालवाकालव चालली होती. पण लिंदेला वाईट वाटूं नये म्हणून तो ती लपविण्याचा प्रयत्न करीत होता.

—देईन अं ! अन् आत्तांच देईन. आणतें अं ! जरा थांब—असें म्हणून ती लगबगीनें आंत गेली व लवकरच सोन्याच्या वर्तुळांत बांधलेला एक बारीक फोटो घेऊन ती बाहेर आली आणि तो आंतूकडे देत म्हणाली:

—लग्नापूर्वीचा हा माझा फोटो कालच मला सांपडला. ही माझी तुला भेट. पण तूं देखील मला भेट दिली पाहिजेस अं ?

तो लिंदेचा फोटो होता. त्याच्या दोन्ही बाजूंना बारीक वाटोळे आरसे होते व तो रेशमी काळ्या दोऱ्यानें बांधला होता.

आंतूनें त्या फोटोकडे डोळे भरून पाहिलें. त्यानें एक सुस्कारा टाकला व लिंदेला जवळ ओढून व तिच्या केंसांवरून प्रेमभरानें हात फिरवून तो घरांतून बाहेर पडला.

तो पोस्ट ऑफिसांत गेला तेव्हां पोस्टमास्तरनें त्याच्याजवळ नव्या वर्षाबद्दल शुभचिंतनपर उद्गार काढले.

इतर शिपाई काम करीत होते तेथें तोही गेला. त्यानें आपल्या भागाचीं पत्रें वेगळीं काढलीं, तीं आपल्या पिशवींत घातलीं आणि मास्तरजवळ जाऊन तो म्हणाला: "आज एकादें रजिस्टर आहे का वांटायला ?"

—हो, दोन रजिस्टरें आहेत तुझ्या वांट्याला—पोस्टमास्तरनें म्हटलें व मेजावर असलेल्या पत्रांपैकीं दोन पत्रें त्यानें आंतूच्या स्वाधीन केलीं.

आंतूची स्थिति कालच्यापेक्षांही जास्त केविलवाणी झाली. एका पत्रावर असलेला ५० रुपयांचा आंकडा त्याच्या मस्तकांत थैमान घालूं लागला !

तें पत्र मुंबईला असलेल्या एका ख्रिश्चन इसमानें आपल्या बायकोला पाठविलें होतें. तें पत्र फोडलें तर तिची काय अवस्था होईल ! नव्या वर्षाकरितां पैशाची वाट पहात ती बसली असेल ! .... अशा शंकांनीं त्याचें मन व्याकुळ झालें.

इगर्ज बरीच दूर होती व अजून गांवचीं घरें दिसत नव्हतीं. डाव्या बाजूला शेत पसरलें होतें व कुळवाडी लोक त्याची मशागत करण्यांत गुंतले होते.

आंतूनें तें रजिस्टरपत्र काढण्याकरितां खिशांत हात घातला आणि इतक्यांत त्याच्या कानांवर 'गुडुम्' असा बंदुकीचा आवाज आला. त्यानें दचकून शेतांत पाहिलें व भयाची लाट दाबण्याचा प्रयत्न करीत त्यानें तें पत्र झटकन् बाहेर काढलें आणि त्याबरोबर लिंदेचा फोटो त्याच्या हातांत आला ! त्या फोटोवर नजर पडतांच 'आंतॉनियु ! तूं काय करीत आहेस हें ? माझ्या करितां अन् तुझ्या ह्या मुलांकरितां तरी असं करूं नकोस ! ' असें काकुळतीनें म्हणत असलेली लिंदेची प्रेमळ मूर्ति त्याला दिसूं लागली.

त्यानें पत्र खिशांत कोंबलें व त्या फोटोकडे पहात तो चालूं लागला !

तो घराकडे पोंचला, तेव्हां त्याची मुद्रा खरोखरच आनंदी व मोकळी दिसत होती. लिंदा दृष्टीस पडतांच तो धांवतच तिच्याकडे गेला व तिचें मस्तक आपल्या हृदयाशीं घट्ट धरून त्यानें म्हटलें: " Linda, minha querida, tu és o meu anjo de guarda, a minha salvação!" (लिंदा, माझ्या प्राणा, तूं माझी संरक्षक देवता आहेस!)

२–११–१९३३

कल्पवृक्षांच्या छायेंत
प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई

# सहनशील

जाईनें आपल्या लहानग्या बाळाला पोटाला घालून निजविलें, पांच वर्षांच्या सदूला काढा शिजवून दिला व म्हाताऱ्या सासूला पेज वाढून ती बाहेर आली.

दिवाळीनंतरचें सोनेरी ऊन हिरव्यागार वनस्पतींवर पडून सृष्टींत आल्हाद ओतीत होतें. लहान निष्पाप बालकाचें मोकळें हास्य दंतपंक्तींतून प्रतीत व्हावें म्हणजे त्याच्या चेहऱ्यावर जी अवर्णनीय शोभा पसरते तशी शोभा उन्हानें सगळीकडे उधळली होती. अंगणांत घातलेला मंडप दुध्याभोंपळयाच्या व दोडक्याच्या वेलींनीं भरला होता व जिकडे तिकडे भोंपळे लटकत होते. घराच्या आजूबाजूला माडांच्या खोडांना दोऱ्या बांधल्या असून त्यांवर पुष्कळ वस्त्रें वाळत टाकलीं होतीं. जवळच्याच एका खोपींत एका थोरल्या मडक्याखालीं जाळ घातला असून त्याच्यावर ओले कपडे

मांडले होते व घराच्या खालीं, नारळीच्या झाडींत वाहणाऱ्या ओढ्यावर कपडे धुणाऱ्या परटिणींच्या बोलण्याचे शब्द किंवा गाण्याचे सूर कानावर पडत होते.

एक पदरी नेसण अंगावर ओढून जाई बाहेर अंगणांत आली. खोपींत जाऊन मडक्याखालचा जाळ तिनें कमी केला व लहानशा काठीनें त्याच्यावरचे कपडे काढून एका चादरीवर टाकले. कपड्यांमधून निघणारी वाफ हाताला लागली म्हणजे तो चटकन् मागें घेत व तोंडांतून 'हाय्' असा शब्द काढीत तिनें मडक्यावर आच्छादलेलीं शेंदीडशें वस्त्रें झपाझप काढून तीं चादरींत टाकलीं व त्यांचा गठ्ठा बांधला.

थोडा वेळ जाऊं दिल्यानंतर तिनें तो गळणारा जड गठ्ठा आपल्या पुष्ट, कणखर हातांनीं उचलून कडेवर घेतला व ती त्याच्या भारानें एका बाजूला वांकत ओढ्यवर आली आणि कांठावरच्या दगडांवर तिनें तो गठ्ठा ठेवला.

ओढा बराच रुंद होता व त्यांत गुडघाभर खोल पाणी वहात होतें. तळाशीं काळया, गुळगुळीत गोट्यांचा थर सांचला होता व त्यांच्या उंचसखलपणामुळें सर्पाच्या अंगाप्रमाणें आकृती उठत होत्या. दोन दोन हातांच्या अंतरावर कपडे धुण्याकरितां, किंचित् कलत्या लांब दहा बारा पाथरी मांडल्या होत्या. ओढ्याच्या दुसऱ्या कांठाला बांध असून केळी व नारळीचीं झाडें ओळीनें लावलीं होतीं. त्याच्याखालीं शेत पसरलें असून तें नुकतेंच पिंवळें होत चाललें होतें व कांहीं कुळवाडी बाया ओणव्यानें विळा चालवीत होत्या आणि शेताच्या पलीकडे भरगच्च कुळागारांत पोफळीच्या झाडांना पाणी घालतांना होणारा शिंपण्याचा गोड आवाज आसपास स्पष्ट ऐकूं येत होता.

जाईनें कपड्यांचा गठ्ठा सोडला व ती खालीं पाण्यांत उतरली. तिनें नेसलेल्या वस्त्राचा, अर्ध्या अधिक जांघा उघड्या ठेवून घट्ट कांचा मारला. हातांतल्या बांगड्या मागें सारून घट्ट बसविल्या. कपाळावर आलेले केंस पाण्याच्या हातानें चटूकन मागें सारले व सोडलेल्या

राशींतील एकेक वस्त्र घेऊन ती तें एका चांगल्याशा पाथरीवर धोपटूं लागली. कपडा दगडावर आदळून आवाज होतांच तिनें नकळत 'शू:' 'शू:' असें म्हणून त्याला साथ करावी व कपडे धुणें रंगांत आलें, साबणाच्या फेंसाबरोबर कपड्याचा मळ झराझर धुऊन जाऊं लागला म्हणजे एखादें कोंकणी गाणें आपल्याशींच गुणगुणावें.

तिचा समाधानपूर्ण चेहरा व किंचित् श्यामवर्ण अंगकांति ओढ्यांतील खड्याप्रमाणें निर्मळ दिसत होती. डोळे किंचित् गंभीर पण आनंदी दिसत होते व त्यांत तिच्या मुग्धवृत्तीचें प्रतिबिंब पडलें होतें, तें भारीच मोहक दिसत होतें. अवयवांत रेखीवपणा नसून ठसठशीतपणा होता. पण जीवनाची सळसळ त्यांत दृग्गोचर होई. हातापायाचे स्नायू मांसल व पिळदार बनले होते. नेहमींच्या कष्टांमुळें शरिराच्या प्रत्येक अवयवांत जोम व काठिण्य भरलें होतें. चेहऱ्यावर दुःखाची व त्रासिकपणाची छाया नसून कोणतेंही काम समरस होऊन करण्यास तयार असलेल्या मनुष्याच्या वृत्तींतील मोकळेपणा दिसत होता.

ओहोळाच्या खालच्या बाजूला दोघी तरुण परटिणी कपडे धोपटीत आपसांत कांहीं बोलत होत्या, मधून मधून हंसत खिदळत होत्या व त्यांच्या हास्यविनोदाचे व संभाषणाचे कांहीं शब्द जाईच्या कानांवर पडत होते; पण तिचें सगळें लक्ष धुण्याकडे लागलें होतें. जाईनें कांहीं कपडे धुवून कांठावर टाकले होते. इतक्यांत एक पोक्त वयाची बाई व एक वीसबावीस वर्षांची तरुणी हातांत कपड्यांचीं बोचकीं घेऊन कांठाजवळ आल्या. जाईनें मान वर करून त्यांच्याकडे पाहिलें व आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें स्मित केलें. जाईला तेथें त्या पाथरीवर कपडे धूत असलेली पहातांच त्या बाईची मुद्रा एकदम बदलली. तिनें तुसड्या स्वरांत तोंड वेडेंवांकडें करीत व शब्दानुरूप अभिनय करीत म्हटलें:

—आलीस ना तूं आमची जाईराणी इथें! केव्हांही इथें आल्यें तरी तूं आम्हांला त्रास द्यायचें कांहीं सोडीत नाहींस. त्या दिवशीं

हीच पाथर अडवून बसली होतीस तूं. आज इथें यावेळीं कुणी नसेल म्हणून लवकर आल्यें तर अवदसेप्रमाणें तूं इथें तयार !

—पण आई, नेहमींच हिचें धुणें कसें चाललं आहे ग ? आम्ही दोनचार दिवसांनीं एकदां धुवावयाला येतों इथें; पण हिच्या धुण्याला कांहीं खळ पडत नाहीं—त्या तरुण परटिणीनें आपल्या आईला साथ केली.

—अग ! सगळ्या आसपासच्या गांवचें धुते ना ही ! सासू मरायला टेंकलेली, नवरा दारूनें झिंगलेला, घरांत दुसरें काम करणारें माणूस नाहीं, पण ही अवदसा शेंकडो वस्त्रें नेहमीं धुते, वाळत टाकते, इस्त्री करते ! देवानें बघ कसें आरोग्य दिलें आहे हिला ! पण आम्हां सगळ्यांना हिचा त्रास ... !

—पण, गाढवीप्रमाणें मरमरून काम केलें तरी पण सुखी आहे का ? सासू जाचते आहे, नवरा मारतो आहे, अन् ही पैशाला महाग. देवाच्या घरचा न्याय ! इतका पैसा घरीं येतो; पण कुठें जातो ? त्या कलालाच्या दुकानांत !—तरुणीनें हावभाव करीत म्हटलें.

जाईनें वर पाहिलें नाहीं किंवा तोंडांतून शब्द काढला नाहीं. तेथें कोणी नसल्याप्रमाणें ती तन्मयतेनें कपडे धुवून, पिळून वर टाकीत होती.

—इतकी मस्त बाई आम्हीं कधीं पाहिली नाहीं. आम्ही इतकें इथें बोलत आहों पण ही आपली स्वस्थ. आम्ही म्हणजे जणूं काय कुत्रींच ! —ती पोक्त बाई आपले हात खाजवीत म्हणाली.

—मस्त झाली आहे ! या पाथरीवर कपडे धुवायचे नाहींत म्हणून सांगितलें तर तिला ऐकायला येत नाहीं. हाताला धरून दूर लोटली पाहिजे, म्हणजे ऐकायला येईल !—तरुणी चेहरा विकृत करीत म्हणाली.

—देव कांहीं दूर नाहीं. ही त्रास भोगते ते थोडे नाहींत. मुलें नेहमीं आजारी ! पण त्यांना औषधपाणी करायला हिच्याजवळ पैसा नाहीं ! हें शासन काय कमी झालें?

जाईचें धुण्याचें काम निर्धास्तपणें चाललें होतें. तिनें एकेक कपडा घ्यावा, तो 'शूः' 'शूः' करीत पाथरीवर धोपटून काढावा, पाण्यांत बुडवून त्याचा मळ धुऊन टाकावा, फिरून धोपटावा व फिरून पाण्यांत जोरानें हलवून पिळून वर टाकावा. त्या बाईनें स्वर चढवून म्हटलें:

—तुझ्या सासूला कळवून तुझी सगळी मस्ती जिरवून टाकूं अं ? मोठी राणी झालीस ना तूं ? आम्ही एवढा वेळ इथें ओरडत आहों तर ही कांहीं येथून हलत नाहीं. हट्टी अवदसा ! सासूच्यापुढें कुठें जातो या राणीचा हट्ट ?

—आई ! तूं पण इतकी भिऊन कशाला ग वागतेस तिला ? दे कपडे दूर टाकून तिचे, मग जाईल इथून ! लोकांचें सुख पाहवत नाहीं हिच्यानें. आम्हीं इथें येणार हें स्वप्न पडलें हिला !—ती मुलगी आपले तिरळे डोळे जाईकडे प्रयासानें स्थिर करीत म्हणाली.

पण जाईला दूर लोटण्याची छाती दोघींपैकी कोणालाच झाली नाहीं. एकटी जाई दोघींनाही पुरून उरणारी होती. तिनें आपल्या कामांत खळ पडूं दिला नाहीं. त्या मायलेकीचे कठोर शब्द कानांवर न पडल्या-प्रमाणें तिची मुद्रा स्थिर गंभीर होती. पाडसापासून दूर असलेली गाय पुनः पुन्हा तोंड वर करून कान टवकारीत दूरवर पहाते, त्याप्रमाणें मधून मधून जाई आपल्या घराकडे तोंड करून कानोसा घेई.

पाणी खळखळ वाहत होतें. मायलेकींची शिव्यांची खळखळ चालली होती. दुरून कपडे धुणाऱ्या स्त्रियांचें गुणगुणणें ऐकूं येत होतें व जाईचें कपडे धुणें जोरानें चाललें होतें.

शेवटीं, कंटाळून त्या दोघीही पाण्यांत उतरल्या व कपड्यांचीं गाठोडीं घेऊन वरच्या बाजूला जाऊन कपडे धुऊं लागल्या. खालच्या बाजूला वस्त्रें धूत असलेल्या दोघी तरुणी आतां आपसांत स्पष्ट बोलूं लागल्या, जाईला त्यांचे शब्द स्पष्ट ऐकूं येऊं लागले.

—पाहिलेंस ना ग मोगरी ? ती बाई किती वाईट बोलली तें जाईला, पण बिचारीनें एका उण्या शब्दानें उत्तर केलें नाहीं तिला. मऊ मिळालें म्हणजे खणायचें !—शेवंती म्हणाली.

—किती सहनशील ग ती ? मी बाई इतकें सहन केलें नसतें कधीं ! जाई देवमाणूस ! कुणाला म्हणून परत जाब करायची नाहीं. लोकांचे अन्याय सगळे पोटांत घालायचे—मोगरीनें सहानुभूतीनें म्हटलें.

—अन् हें पाहिलेंस मोगरी, धरीं त्रास पण किती सोसते ग ही ! कांहीं विचारूं नकोस बाई. पण हिच्या तोंडावर तसें कांहीं दिसतें का ? नेहमीं एक मुद्रा. आपल्या कामांत मग्न ! घरच्या माणसांचें सुख तिला माहीत.

—नवरा दारू पिऊन हिला मार देतो. सासू कांहीं धंदा करीत नाहीं व हिला बिचारीला त्रास करते. मुलांची किरकीर नेहमींच. रात्रींची नीज देखील नाहीं बिचारीला ! हिनें शेंकडों वस्त्रें अंग मोडून चांगलीं धुवावींत, इस्त्री करून घड्या करून नवऱ्याकडे द्यावींत व मग त्यानें पैसे आणून दारूच्या दुकानांत ओतावे ! मुलांना औषधपाणी करायला देखील हिच्याजवळ पैसा नाहीं ! फुटक्या नशिबाची बिचारी !— शेवंतीनें सुस्कारा टाकीत म्हटलें.

—जाई, अग जाई !—मोगरीनें जाईला हाक मारली.

हातांत कपडा धरून जाई उभी राहिली. मोगरीकडे पाहून किंचित् स्मित केलें व डोळ्याच्या खुणेनें विचारलें:

—कां हांक मारलीस मला ?

—ती कां भांडली ग तुझ्याजवळ ? अन् तूं गप्प कां राहिलीस ग ?

—तें नेहमीचेंच, त्याला काय किंमत द्यायची ... !—अशा अर्थाचा आविर्भाव करून जाई फिरून कपडे धुऊं लागली.

कांहीं वेळानें तिनें सगळीं वस्त्रें धुऊन पिळून काढलीं, आपलें अंग धुऊन का , कांठावर येऊन तिनें धुऊन टाकलेल्या वस्त्रांचा गठ्ठा बांधला व तो ती उचलणार इतक्यांत तिची नजर जवळच पडलेल्या रुपयाकडे गेली. तिनें तो रुपया उचलून घेतला व पदराच्या टोंकाला बांधीत तिनें मनांत म्हटलें: 'चौकशी झाली तर ज्याचा त्याला परत करीन. विचारायला गेलें तर प्रत्येक जण आपला म्हणेल. चौकशी नाहीं

झाली तर आजारी असलेल्या आपल्या बाळाला औषधपाणी करण्या-करितां उपयोगी पडेल.' तिनें गठ्ठा उचलून कडेवर घेतला व ती घराकडे आली. बाहेर ओट्यावर तिची म्हातारी सासू बसली होती. सून नसल्यामुळें दीडदोन तास तिचें तोंड बंद होतें. यामुळें तिला बेचैन वाटत होतें. जाई दृष्टीस पडतांच तिचें तोंड आपोआप उघडलें ती कर्कश आवाजांत म्हणाली:

—ओढ्यावर चकाट्या पिटीत बसली होतीस वाटतें? इकडे मुलाचा प्राण गेला तरी तुला त्याची पर्वा नाहीं! कठोर काळजाची राक्षसीण!

जाईनें कडेचा गठ्ठा एका फळ्यावर ठेवला व तो सोडून त्यांतील एकेक वस्त्र अंगणांतील दोरीवर वाळत टाकण्यास सुरवात केली. ओलेतें वस्त्र तिच्या अंगाला घट्ट बसलें असून त्यांतून पाण्याचे थेंब निथळत होते. म्हातारीला तिनें कांहींच उत्तर दिलें नाहीं.

म्हातारीनें आपलें माथें खाजवीत म्हटलें:

—अवदसा मेली! खाऊन माजली आहे बघ कशी! कितीही बोललें तरी लाज नाहीं निलाजरेला. इथें मी भुकेनें तळमळत आहें त्याची हिला काळजी नाहीं. बसली गोष्टी करायला! कोण अवदसा मिळाली गप्पा मारायला?

जाईनें तीं वस्त्रें झपाझप वाळत टाकलीं व ती ओट्यावर सासूच्या जवळ आली. पितळेच्या कांड्यानें दांत कोरीत म्हातारीनें म्हटलें:

—तूं मेली दिवसें दिवस माजते आहेस, पण तीं पोरें नेहमीं आजारी! तुझा पायसरच वाईट. तूं येण्यापूर्वी माझा चिंतू किती चांगला होता. विडीचें देखील व्यसन नव्हतें त्याला! आतां बघ कसा झाला आहे तो! आणि मी पण किती चांगली होतें. काठी हातांत धरण्याची पाळी तेव्हां नव्हती आली माझ्यावर! अन्न पण किती चालत असे! पडीचें शीत मी एकटीनें जेवावें! आतां अर्धपड देखील अधिक होतें मला! तूं सत्यानाश केलास आमचा!

जाईनें वस्त्र बदललें व ती आंत गेली. पांच वर्षांचा निळू आजी-

जवळ बसून खेळत होता. त्याचे कान एका फडक्यानें बांधले होते. माथ्याला कांद्याचें कवळ घातलें होतें. नाकांतून शेंबूड वहात असून तो तोंडभर पसरला होता. मधून मधून तो आपल्या चिमुकल्या हाताच्या मनगटांनीं नाकांतला शेंबूड पुसून टाकीत होता.

जाई बाहेर आली व एका फडक्यानें तिनें मुलाचें तोंड पुसून काढलें. त्याला थोडा काढा दिला व ती आंत गेली.

म्हातारी तणतणूं लागली :

—मी इतकी बोलतें आहें तरी मेली परवा करते आहे तर पहा. मस्त अवदसा ! चिंतू नेहमीं मार देतो तरी ही कांहीं निवळत नाहीं !

म्हातारीचें हें बोलणें चाललें असतांनाच ओढ्यावर जाईला शिव्या देत असलेली परटीण आली. तिला पाहून म्हातारीला आनंद झाला. आतां आपल्याला उत्तम श्रोता मिळाला असें पाहून ती म्हणाली :

—बैस ग मोगल्या अशी आणि ऐक आमच्या सुनेची करणी !

मोगल्याचे बटबटीत तिरवे डोळे आनंदानें चमकले. म्हातारीच्या शेजारीं बसत बसत म्हणाली :

—तिची करणीच सांगायला आलें आहें मी तुझ्याकडे.

म्हातारीनें कानांवरून हात फिरविला, आपल्या खसखशीत केसांस बोटें घालून चाळविलीं व उत्सुकतेनें म्हटलें :

—काय केलें अवदसेनें ? भांडली ग तुमच्याजवळ ?

—भांडण बरें पण तिची मस्ती वाईट. त्या मोठ्या पाथरीवर कपडे धुऊं लागली, किती परीनें सांगितलें, पलीकडची पाथर रिकामी आहे तिथें धू. पण हूं नाहीं कीं चूं नाहीं.

—मेली हडळ कुठली ! सगळ्यांना त्रास द्यायला अवतरली आहे इथें. जाई, अग जाई, जरा बाहेर ये पाहूं.

—ती कसची येते बाहेर ! तोंड बरें दाखवील ती मला !

जाई बाहेर येऊन दारापाशीं उभी राहिली. मोगल्याला पाहतांच ती नेहमींप्रमाणें हंसल्याशिवाय राहिली नाहीं. मोगल्यानें मान खालीं घालून म्हटलें :

— काय विचारणार तूं तिला ?

— जाई, तूं हिच्याबरोबर भांडलीस का ग ?

जाईनें उत्तर केलें नाहीं. लहानगा रडूं लागला त्याला आणण्याकरितां ती आंत गेली.

— पाहिलेंस तुझी देखील पर्वा नाहीं तिला, मग आमचा काय पाड ? माझी सून झाली असती तर डागली असती. तुम्ही माजविली आहे तिला आणि चोरी करण्यांत देखील तरबेज आहे तुमची सून — मोगलें विजयानंदानें ओरडली.

— कसली चोरी केली तिनें ? करील, खुशाल करील ती चोरी. तिचा काय नेम ! नांवाला काळोखी फासली ना आमच्या ! — म्हातारीनें विचारिलें.

— कांठावर रुपया ठेवून वस्त्रें धुवायला ओढ्यांत उतरलों. परत येतांना रुपया नाहीं. जवळ तुझी सून तेवढी होती.

जाई आंत भात तयार करीत होती. म्हातारीचे "जाई जाई" हे शब्द तिच्या कानावर पडतांच ती लगबगीनें बाहेर आली. म्हातारी काठी टेंकीत आंत गेली. थेट जाईच्या खोलींत जाऊन एका फडताळांत तिनें हातानें चांचपून पाहिलें व हाताला लागलेला रुपया मुठींत धरून ती बाहेर आली.

म्हातारीनें तिला विचारलें:

— सगळी करणी थोडी म्हणून तूं चोरी करायला लागलीस ? सटवी कुठली ! — तोंडाचें बोळकें पुढें मागें करीत तिनें म्हटलें. तिच्या तोंडांत शिल्लक राहिलेले दोन पिंवळे दांत लटलट हालत होते. करड्या केंसांच्या झिंज्या तोंडावर अस्ताव्यस्त पसरल्या होत्या. उजव्या डोळ्यांत वडस वाढला असून त्यामुळें तिचा चेहरा भयानक दिसत होता. म्हातारीनें पुढें म्हटलें:

— मोगल्याचा रुपया चोरलास ना ग तूं ? कपाळकरंटी कुठली !

— चोरला नाहीं, मिळाला — जाईनें शांतपणें म्हटलें.

—घरांत चोरून खाऊन समाधान होत नाहीं, म्हणून बाहेर चोरायला गेलीस ?

जाईनें उत्तर केलें नाहीं. हातांत सूप घेऊन ती झराझर डाळ निवडूं लागली.

—तुमची सून आहे हें न पाहतां तिच्या झिंज्या उपटून टाकाव्या असें वाटतें मला!—मोगलें जास्तच विद्रूप चेहरा करून म्हणाली.

मोगलीचे हे शब्द ऐकून म्हातारीला चेव आला. ती प्रयासानें उठली व भिंतीला टेंकून ठेवलेली काठी उचलून तिनें जाईच्या दंडावर दोन्ही हातांनीं मारली. जाईचा डावा हात हलला व सुपांतील डाळ जमिनीवर सांडली. म्हातारीला नवीन कारण मिळालें. ती ओरडली:

—माझ्या रागानें डाळ ओततेस नाहीं? संसाराची माती केलीस तूं आमच्या! लोकांचे पैसे चोरलेस कां म्हणून विचारलें तर डाळ शिंपतेस नाहीं? येऊं दे माझा चिंतू....

आणि ह्याच वेळीं चिंतू घराजवळ पोहोंचला. अस्थिपंजर झालेला त्याचा देह दारूच्या निशेंत झोके खात होता. व्यसनातिरेकानें त्याची माणुसकी नष्ट झाली आहे असें त्याच्या चेहऱ्यावरून दिसत होतें. त्याच्या पाठीवर धुवायला आणलेल्या कपड्यांची मोटली होती.

तो बरळत ओट्यावर आला. पाठीचा गठ्ठा त्यानें जमिनीवर आदळला व तो तेथेंच बसला.

त्याच्या आईनें म्हटलें:

—चिंतू, पाहिलीस तुझ्या बायकोची मस्ती!

तोंड वेडेंवांकडें करीत चिंतूनें बायकोकडे पाहिलें. अश्रूंनीं भरलेल्या डोळयांनीं ती जमिनीवर सांडलेली डाळ सुपांत भरीत होती. त्यानें संतापानें विचारलें:

—काय केलें अवदसेनें?

—डाळ सांडली बघ कशी! मोगल्याबरोबर आज भांडली ओट्यावर. तिला शेजारी पाजारी कोणी नकोत. तुझीं मुलें नेहमीं आजारी. लोकांची पांग धरायला पाहिजे. पण हिला सगळे लोक कस्पटासमान!

—कां भांडली ? सांग आई. बायको आहे हें न पाहतां डाग देतों बघ, मेली तर मेली ! दुसरी करीन ! या चिंतूला बायकांची वाण नाहीं पडणार !

—ओढ्यांतल्या मोठ्या पाथरीवर कपडे धुवायला बसली होती. मोगल्यानें तिला सांगितलें, जरा पाथर मोकळी करून दे, तर हिनें तिची थट्टा केली.

चिंतू उठला. त्यानें म्हातारीच्या हातून काठी घेतली व म्हटलें:

—हजारदां सांगितलें तुला कीं मोगल्याबरोबर भांडूं नकोस म्हणून. पण तूं ऐकत नाहींस. मार बसल्याशिवाय तूं निवळत नाहींस...

—इतक्यानें झालें नाहीं बाबा ? तुझ्या बायकोनें मोगल्याचा रुपया चोरला ! हा बघ !—म्हातारीनें चिंतूपुढें रुपया करीत म्हटलें.

—आमच्या नांवाला काजळ फांसलें हिनें. आमच्या घराण्यांत कोणी कधीं चोरी केली नाहीं. कोणी व्यसन केलें नाहीं. पण हिनें काळोखी आणली !

जाई उठून आंत गेली. पाळण्यांत निजलेला बाळ रडूं लागला. त्याला उचलून तिनें हृदयाशीं धरलें. तापानें त्याचें आंग फणफणत होतें. छातींत भरलें होतें व श्वासोच्छ्वासाची ‘ घरघर ’ चालू होती.

चिंतू काठी घेऊन आंत आला व जाईच्या पाठीवर जोरानें रट्टा ओढीत त्यानें म्हटलें:

—तूं चोरलास ना रुपया तिचा ?

जाईनें मान हालविली. चिंतूनें तिच्यावर आणखी रट्टे ओढीत म्हटलें:

—तूंच चोरलास ... तूंच चोरलास ! ...

जाईच्या पाठीवर काठ्या बसत होत्या व तिचे अश्रू हृदयाशीं आंवळून धरलेल्या बाळाच्या तप्त अंगावर पडत होते !

१०-७-१९३२

**कल्पवृक्षाच्या छायेंत**
प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई

# सफ्फा मशीद

फोंड्याहून पणजीकडे जाणाऱ्या रस्त्यानें आज मी व प्रभा फिरायला गेलों होतों. प्रभा म्हणजे निसर्गाची आवडती मैत्रीण. निसर्गाच्या खऱ्या सौंदर्याचा आस्वाद तिनें फार मार्मिकपणें घ्यावा. आकाशांतील विरल ढगांवर क्रमाक्रमानें व आश्चर्यकारक रीतीनें बदलत जाणारे मिश्र मनोहर विविध रंग व त्यामुळें सभोंवतालच्या सृष्टीवर उमटणाऱ्या तरल छटा यांचें निरीक्षण करतांना तिला फार आनंद होई.

आज नेहमींपेक्षां आम्ही बरेच पुढें आलों. नजरेच्या टापूंत दिसणाऱ्या टेंकड्या व डोंगर, त्यांच्या पृष्ठभागावर उगवलेल्या दाट हिरवळीमुळें व लहान झुडुपांमुळें, फुलें काढलेल्या हिरव्या गालिच्याप्रमाणें दुरून शोभत होते. रस्त्याच्या उजव्या बाजूला विस्तृत, उंच-

सखल माळ पसरला असून त्यांत जागोजाग भात, नाचणे, उडीद इत्यादि पिकें वाढलेलीं दिसत. मधूनच एखादा ओढा घाईघाईनें वाट काढीत, ध्येयवाद्याप्रमाणें संकटाची पर्वा न करतां, पुढें निघून जाई.

एका ओहोळाच्या पलीकडे झाडांच्या आडून दिसणाऱ्या एका जुन्या इमारतीकडे बोट दाखवून प्रभेनें मोठ्या उत्सुकतेनें म्हटलें:

—ही कसली इमारत ? फार जुनी दिसते.

—या इमारतीचें नांव सफ्फा मशीद. फार इतिहासप्रसिद्ध स्थल आहे हें. सहा शतकांचा अद्भुतरम्य इतिहास हिच्या मागें उभा आहे—मी म्हटलें.

या उत्तरानें प्रभेचें कुतूहल वाढलें. तिनें उत्सुकतापूर्ण स्वरानें म्हटलें:

—जरा पाहून येऊं ना ती मशीद.

रस्त्याच्या खालीं उतरून मळलेल्या पायवाटेनें आम्ही लगेच सफ्फा मशिदीच्या तलावावर पोंहोंचलों. तलाव विस्तृत असून त्याच्या कांठावर पूर्वेकडे तोंड करून ही मोडकी मशीद उभी आहे. तलावांत उतरण्याला त्याच्या लांबीच्या बाजूनें दोन दोन व रुंदीच्या बाजूनं एकएक, मिळून एकंदर सहा दगडी पायऱ्यांचे भव्य जिने आहेत. तलावाच्या स्वच्छ निळ्या पाण्यांतून आंत खोलवर गेलेल्या दगडी पायऱ्या दिसतात. कांठच्या उंच दगडी भिंतींना सारख्या आकाराचे व नमुन्याचे दरवाजे खोदले असून आंत लहान लहान खोल्या राखलेल्या दिसतात. कांठच्या भिंतींचा कांहीं भाग तलावांतील पाण्यांत जीव देण्याकरतांच कीं काय, भेसुरपणें पाण्यावर कललेला आहे. कांठावर दगडांच्या भेगांत वाढलेलीं वड, पिंपळ, वगैरे पाषाणभेदी झाडें व मशिदीचा वरचा भाग यांचें कांठाजवळच्या पाण्यांत प्रतिबिंब पडलेलें आहे, आणि मधल्या पाण्यांत निळें आकाश पहुडलें आहे.

मशीद उंच आहे, पण फारशी विस्तृत नाहीं. तिच्या मोडक्या स्वरूपाकडे पाहिल्यावर काळाच्या विध्वंसक कार्याची कल्पना होते. पाषाण कठीण खरा; पण क्षयरोगाप्रमाणें काळ त्यालाही खाऊन टाकतो! सगळ्या कोंकण सुभ्यांत एकाकाळीं गाजलेली ही वैभवसंपन्न मशीद उन्हाच्या

व पावसाच्या त्रासानें आज काळी ठिक्कर पडलेली आहे ! जेथें विजेत्या मुसलमानांच्या प्रार्थनेचा कोलाहल दिवसरात्र ऐकूं येई, तेथेंच आज स्मशानवत् शांतता पसरलेली दिसते. मशिदीच्या काळ्याकुट्ट दगडी भितींना बाहेरून, वरखालीं, मुसलमानी पद्धतीच्या लहान मोठ्या कमानी खोदलेल्या असून त्यामुळें सगळ्या इमारतीला वेगळें, अपरिचित व कांहींसें गूढ स्वरूप प्राप्त झालेलें दिसतें. मशिदीच्या सभोंवतीं पडझड झालेले व कांहीं कललेले दगडी खांब उभे आहेत व पुढें विस्तृत पटांगण असून त्याचे दगडाच्या रांगांनीं निरनिराळे विभाग केलेले दिसतात.

मुख्य दरवाजाकडे नेणारा दहा बारा पायऱ्यांचा अवजड जिना चढून आम्ही मशिदींत शिरलों. एका दालनाशिवाय आंत जागा नव्हती. खिडक्या उघड्या असून त्यांना दारें नव्हतीं. दरवाजा समोरच्या भिंतीला एक फडताळ खोदलें असून, तेथें जाण्याकरतांच कीं काय, चारपांच पायऱ्यांचा एक लहानसा जिना होता व त्याला टेंकून एक कुबडी होती.

प्रभेचें लक्ष त्या कुबडीकडे जातांच तिनें मोठ्या कुतूहलानें मला विचारिलें :

— या कुबडीचा अर्थ काय ? याला कांहींतरी इतिहास असेल काय ?

पण तो इतिहास मला ठाऊक नव्हता म्हणून मी म्हटलें : "बाहेर कुणाजवळ विचारूं तरी."

पायऱ्या उतरून आम्ही खालीं आलों व मशिदीला डाव्या बाजूनें वळसा घालून जवळच दिसणाऱ्या पांचसहा जुन्या थडग्यांकडे वळलों. त्यांपैकीं एक थडगें बरेंच मोठें असून, त्याच्याजवळच एक लहान विहीर होती. थडग्यांवर मोठमोठीं झाडें वाढलीं होतीं व त्यामुळें आसपासच्या वातावरणांत एक प्रकारची उदासीनता, गूढता व रहस्यमयता भरून राहिली आहे असें वाटे. हें पाहून प्रभेनें मला फिरून प्रश्न केला :

— हें थडगें कुणाचं असेल बरें ?

मशिदी भोंवतालची प्रदक्षिणा पुरी करून आम्ही तलावाच्या कांठावर आलों. दोघांच्याही मनांत त्या कुबडीसंबंधीं व त्या थडग्यासंबंधीं

तीव्र जिज्ञासा उत्पन्न झाली. या वस्तूंशीं कोणतातरी रहस्यमय, अद्भुत-रम्य इतिहास निगडित झाला असेल काय ? असा प्रश्न तीव्रतेनें मनांत उभा राहिला.

तलावाच्या कांठावर बसून गळानें मासे पकडण्यांत एक वृद्ध मुसलमान गढून गेला होता. त्याच्याजवळ कांहीं माहिती मिळेल, या आशेनें आम्ही त्याच्याजवळ गेलों व त्याला म्हटलें:

— मशिदींत असलेली कुबडी व तें मोठें थडगें यांसंबंधीं तुम्हांला कांहीं माहिती आहे काय ?

— ती एक मोठी मनोरंजक व हृदयस्पर्शी हकीगत आहे — त्या मुसलमानानें उत्तर केलें.

— कृपा करून ती हकीगत तुम्ही आम्हांला सांगूं शकाल काय ?— मी त्याला विचारलें.

— अवश्य ! पण तो इतिहास थोडा लांब असल्यामुळें तो लवकर सांगून होणार नाहीं. तुम्ही एथें बसा. मी ती हकीगत सांगतों— इतकें म्हणून त्यानें पाण्यांतला गळ काढला व त्याला भक्ष्य लावून तो फिरून पाण्यांत टाकला आणि नंतर त्यानें कुबडीची गोष्ट सांगण्यास सुरवात केली.

सन १४८० तील गोष्ट. गोमंतक प्रांत त्यावेळीं बहामनी बादशहांच्या ताब्यांत असून त्याला तळकोंकण सुभा असें म्हणत. या सुभ्याची मुख्य राजधानी फोंडा ही असल्यामुळें तळ कोंकणचा मुख्य सुभेदार उल्मुल्क हा तेथेंच मर्दनगड नांवाच्या किल्ल्यावर रहात असे. शहराभोंवती भक्कम तटबंदी असून तिचे अवशेष अद्याप पहावयाला सांपडतात. उल्मुल्क हा फार सज्जन व धार्मिक वृत्तीचा मुसलमान असून ज्योतिषावर त्याची फार श्रद्धा होती. त्याच्या पदरीं एकदोन बरे वाईट ज्योतिषी सदैव असत. त्यांच्याकडून स्वतःचें भविष्य आधीं वर्तवून घेऊन, त्याप्रमाणें त्यानें आपलें वर्तन आंखावें व येथील राज्य-कारभारांतल्या महत्वाच्या घडामोडी कराव्या.

त्याला अमिना नांवाची अठरा वर्षांची एकुलती एक मुलगी होती.

अमिना चतुर, हुशार व सुंदर होती. जातीनें स्त्री, पण बापानें तिला दिलेलें शिक्षण सगळें मुलाचें. यामुळें ती नेहमीं उल्मुल्कच्या सहवासांत असे. घोड्यावर बसून उल्मुल्क फिरावयाला जाऊं लागला म्हणजे त्याच्यामागें घोड्यावर बसून अमिना तयार ! राज्यकारभाराच्या एकाद्या गहन कामांत उल्मुल्क गुंतलेला असला तरी त्याच्या रुबाबदार गंभीर चेहऱ्यामागें अमिनेचें सुंदर, मोहक व विपुल केशसंभारांत लपलेलें मुखकमल हटकून दिसावयाचें. अमिनेनें एकदां धर्मग्रंथ मोठ्यानें वाचावा व उल्मुल्कानें प्रेमानें, कौतुकानें व अभिमानानें तिच्याकडे पाहून तिचें नादमधुर स्वरांत चाललेलें वाचन ऐकण्यांत गुंगून जावें असा क्रम नेहमीं चाले. केव्हां केव्हां उल्मुल्क चिंताग्रस्त मनानें बुरुजावर बसून आसपासच्या देखाव्याकडे उदास नजरेनें पहात बसे. त्यावेळीं अमिना बापाजवळ लडिवाळपणानें येई व त्याच्या डोक्यांत चाललेले दुःखद विचार काढून टाकून त्याचें मन रिझवण्याकरितां, खालीं पसरलेल्या सृष्टिसौंदर्याकडे त्याचें लक्ष वेधीत असे. आकाशांतल्या एकाद्या ढगाकडे अंगुलीनिर्देश करून तिनें म्हणावें : “ बाबा, पंख पसरून आकाशांत उडणाऱ्या पक्ष्याप्रमाणें दिसणारा तो ढग पाहिलात का ? ” किंवा “ किल्ल्याच्या खालीं पसरलेल्या खोल व विस्तृत दरींत उभे असलेले गगनभेदी अजस्र वृक्ष एकाद्या ठेंगू माणसाप्रमाणें कसे दिसतात ते पाहिलेत का ? ” किंवा “ कांहीं मैलांवर दिसणारा समुद्राचा कांहीं भाग निळ्या क्षितिजाशीं भिडल्यामुळें तेथील देखावा किती उदात्तरम्य दिसतो ! ” इत्यादि प्रश्न ती उल्मुल्कला चतुरतेनें करी, व त्याचें मन दुःखनिवृत्त करण्याकरतां झटे.

कांहीं वर्षांपासून उल्मुल्क फार उदासीन दिसत होता. कोणती तरी खोल चिंता त्याच्या हृदयाला त्रास देई. रात्रीच्या रात्रीं त्यानें कोणत्यातरी विचारांत जागत काढाव्या. त्याची आवडती अमिना त्याचें कष्टी मन रिझविण्याचा आटोकाट प्रयत्न करी. पण त्याच्या म्हातारपणाबरोबर त्याचें अज्ञात दुःखही वाढत जाई.

एकदां सफ्फा मशिदींत एक नवीन फकीर आला असल्याची वार्ता

सर्वत्र पसरली. शेंकडो भाविक मुसलमान त्याच्या भेटीला गेले. सगळ्या लोकांवर त्या अज्ञात फकिराची विलक्षण छाप बसली. हात व चेहरा पाहून तो अचूक भविष्य वर्तवीत असे, अशी त्याची लौकरच ख्याती झाली.

सगळा दिवस त्यानें धर्मग्रंथांच्या वाचनांत व परमेश्वर भक्तींत घालवावा. तो अगदीं तरुण असला तरी संसारिक सुखांबद्दल त्याच्या प्रत्येक कृतींत अनासक्ति प्रतिबिंबित होई. त्याच्या कोंवळ्या मुखावर उदासीनता, गंभीरता व साधुत्वाचें तेज यांचा मिलाफ झालेला दिसून येई. त्याची मुद्रा मोहक व तेजस्वी असून तिच्यावर जन्मजात मोठेपणाचें पाणी खेळत असे. त्याचा मुळचा गोरा वर्ण उन्हाच्या त्रासानें जरा काळवंडल्यासारखा दिसे. बारीक नाजूक दाढी किंचित् तांबडी दिसत होती. त्याच्या विशाल डोळ्यांत ध्येयवाद्यांचा करारीपणा झळकत होता. परंतु त्याच्या आयुष्यांत कोणतें तरी रहस्य लपून बसलेलें आहे व त्याचें मन कोणत्या तरी भीतीनें व्याप्त झालेलें आहे, असें त्याच्या चेहऱ्याचें व वागणुकीचें सूक्ष्म निरिक्षण करणारास चटकन् कळून येई.

त्यानें गांवांत मुळींच फिरकूं नये. लोकांचा सहवास टाळण्याचा त्याचा प्रयत्न पाहून पुष्कळांना आश्चर्यच वाटे. परंतु त्याच्या भेटीला येणाऱ्या लोकांशीं तो अत्यंत सौजन्यानें व प्रेमानें वागत असे. त्याच्या नजरेंत व बोलण्यांत एक प्रकारची मोहिनी होती. त्यामुळें सगळे भाविक त्याचे दास होऊन परत जात. सफ्फा मशिदींत बसून त्यानें कुराण वाचावें व नमाज पढावा, आणि पलीकडच्या धर्मशाळेंत लोकांनीं दिलेला शिधा शिजवून खावा. सूर्याचे किरण सौम्य होत जाऊं लागले म्हणजे तलावाच्या कांठावर बसून त्यानें कोणत्या तरी गोष्टीचें चिंतन करीत बसावें.

याच वेळीं सगळीकडे अशी बातमी पसरली कीं, विजयानगरचा पराक्रमी राजा मल्लिकार्जुन हा दहा हजार फौजेनिशीं फोंड्यावर चाल करून येत आहे. तळकोंकण काबीज करण्याच्या हेतूनें यापूर्वी

मल्लिकार्जुन राजानें फोंड्यावर दोनदां स्वारी केली होती. परंतु त्यांत त्याला यश आलें नाहीं. तरी पण, त्याच्या नांवाचा धाक विलक्षण होता. मजल दरमजल करीत हिंदु सैन्य तिनई घाटाच्या मार्गानें येत असून तें गोमंतकाच्या हद्दींत देखील शिरलें, अशी खात्रीलायक बातमी कळतांच उल्मुल्क फारच घाबरला. या भयंकर संकटाला तोंड कसें देणार हें त्याला समजेना. सैन्य कमी, दारू गोळ्याचा तुटवडा. अशा स्थितींत राजधानीचा बचाव करणें अशक्य होतें.

सुभेदाराच्या कानांवर मशिदींत उतरलेल्या फकिराची कीर्ति या पूर्वींच गेली होती. त्याची भेट घेऊन ज्योतिषासंबंधीं त्याला कांहीं प्रश्न विचारावे असें सुभेदाराच्या मनांत बऱ्याच दिवसांपासून होतें. उल्मुल्कनें त्याला किल्ल्यावर येऊन आपणास भेटून जाण्याची विनंति केली होती. परंतु कां कुणास ठाऊक, फकिरानें निस्पृहपणें त्याला नकार कळविला होता. शेवटीं, संकट तर अगदीं दाराशीं येऊन ठेपलें आहे हें पाहून उल्मुल्कनें स्वतःच त्या फकिराच्या भेटीला जाण्याचें ठरविलें.

आपल्या आवडत्या अमीनेला बरोबर घेऊन सुभेदार मर्दनगडावरून सफफा मशिदींत आला. तेथें परमेश्वराचें मनःपूर्वक स्मरण करून तो समोरच्या धर्मशाळेंत आला. त्या तरुण फकिराचें दर्शन होतांच सुभेदाराला फार समाधान झालें. प्रथमदर्शनींच त्याच्या मनांत त्या अज्ञात तरुणाबद्दल प्रेमादर उत्पन्न झाला. त्यानें यापूर्वीं पुष्कळ फकीर पाहिले होते, पण इतकें पावित्र्य, इतकें तेज व अशी त्यागी वृत्ति त्याला कुठेंच दिसून आली नव्हती.

कांहीं धार्मिक ग्रंथ वाचण्यांत गढून गेलेल्या त्या फकिरानें, चाहूल ऐकतांच मान वर करून सुभेदाराला व अमीनेला पाहिली व त्याची मुद्रा एकदम पालटली. कोणती तरी अनिष्ट गोष्ट घडत असल्याप्रमाणें त्याच्या मुद्रेंत विलक्षण बदल झाला. चेहऱ्यावर जास्तच गंभीरता व उदासीनता पसरली. कोणत्या तरी अनावर भावनांची खळबळ हृदयांत उडत आहे; पण ती बाहेर दिसूं नये म्हणून तो फकीर फार काळजी घेत आहे असें दिसलें.

किंचित्काल तो गोंधळांत पडला; पण लगेच त्यानें सुभेदाराला व अमीनेला जवळच बसण्यास सांगितलें.

सुभेदारानें मोठ्या प्रेमळपणानें फकीराला म्हटलें:

—आपला गांव कुठें तें आम्हाला कळेल का?

हा प्रश्न सुभेदारानें केला खरा; परंतु लवकरच त्याला आपली चूक कळून आल्याशिवाय राहिली नाहीं. फकिरांना त्याचें नांव गांव विचारणें अप्रशस्त होय, हें त्याला ठाऊक नव्हतें असें नाहीं. परंतु त्या फकिराला पाहिल्याबरोबर त्याच्या मनांत जी अननुभूत मधुर भावना उत्पन्न झाली, त्यामुळें त्या फकिराचें पूर्ववृत्त समजून घेण्याची तीव्र जिज्ञासा त्याच्या मनांत उत्पन्न झाली, व म्हणूनच त्यानें फकिराला वरील अयोग्य प्रश्न विचारला. हा प्रश्न ऐकतांच फकीर थोडा वेळ विचारांत पडला. त्याच्या मुद्रेवर चिंतेची छाया पसरली. नंतर त्यानें म्हटलें: “जग हाच माझा गांव!”

या उद्गारांतील निराशेचा ध्वनी सुभेदाराच्या लक्षांत आल्याशिवाय राहिला नाहीं. फकिराच्या वरील विक्षिप्त उत्तरांत दृग्गोचर होणाऱ्या त्याच्या वैतागाचें कारण काय असेल हें जाणण्याची सुभेदाराला इच्छा उत्पन्न झाली व त्यानें फिरून विचारलें:

—इतक्या तरुणपणीं आपण हा कष्टमय फकिरीपेशा पत्करावा याचें आश्चर्य वाटतें. आपणास आईबाप, बहीणभाऊ वगैरे जवळची स्वकीय मंडळी नाहींत काय?

अमिना निश्चल नजरेनें फकिराकडे पहात होती. कोणती तरी अज्ञात जादू आपलें मन त्याच्याकडे आकृष्ट करीत आहे असें तिला वाटलें. कोणत्या कारणाकरितां आपल्या हृदयांत त्या फकिराबद्दल प्रेम उत्पन्न होत आहे व हें प्रेम कोणत्या प्रकारचें, हें मात्र तिला समजेना. त्याच्या किंचित उदासीन अशा गंभीर मुद्रेवर तिच्या शोधक नजरेला गोंधळ, भीति, कारुण्य इत्यादि विकार प्रतिबिंबित झालेले दिसले. सुभेदाराच्या प्रश्नाला फकिरानें थोड्या वेळानें उत्तर दिलें:

—देवानें ज्याला दूर लोटलें, त्याला इतर आप्तेष्ट असले नसले सारखेंच नाहीं का ?

फकिराच्या या गूढ उत्तरामुळें सुभेदार जास्तच गोंधळांत पडला. कांहींतरी बोललें पाहिजे म्हणून त्यानें म्हटलें :

—येथें कोणत्या उद्देशानें आपलें येणें घडलें ?

—सगळे देश मी पालथे घातले—फकीरानें एक दीर्घ निश्वास टाकून उत्तर दिलें—हिंदुस्थान फिरलों; मोठमोठ्या संतांच्या भेटी घेतल्या; मक्केची यात्रा करून आलों; पण शांतीचा लाभ घडला नाहीं. कर्तव्यपालनाशिवाय शांति अशक्य आहे. मी माझें कर्तव्य अद्याप पार पाडलेलें नाहीं. त्याच्या पालनानंतर कदाचित् मला अखंड शांति मिळेल. फकिराचे हे निराशापूर्ण उद्गार ऐकून सुभेदाराला आपण त्याला त्याच्या पूर्वचरित्राबद्दल प्रश्न केले हें वाईट झालें, असें वाटलें, व त्याच्या अज्ञात स्थितीची दया आली. अमिनेच्या डोळ्यांत अश्रु चमकले.

कांहीं वेळ गेल्यानंतर सुभेदारानें म्हटलें :

—हस्तसामुद्रिकांत आपण बरेंच प्रावीण्य मिळविलें आहे असें आम्हांस कळलें. म्हणून आपणांस कांहीं प्रश्न विचारावे असें मनांत आहे.

—ज्योतिषावर आपली फारच श्रद्धा दिसते—असें म्हणून सुभेदारानें पुढें केलेला हात त्यानें किंचित् कांपणाऱ्या आपल्या हातानें धरून त्याच्या तळहातावरील रेषा पाहण्यास सुरवात केली. सुभेदाराची उत्कंठा शिखरास पोहोंचली. अमीना निश्चल नजरेनें फकिराकडे पाहूं लागली.

सुभेदाराच्या हाताचें निरीक्षण संपवून फकिरानें जड आवाजांत म्हटलें :

—तुमच्या राज्यावर लवकरच एक भयंकर संकट येणार आहे.

या भविष्य कथनानें अमिना घाबरली; पण सुभेदार अस्वस्थ झाल्याचें दिसलें नाहीं. फकीर पुढें काय सांगणार हें जाणण्याकरितां मात्र तो अधीर झाला. अमिना भेदरलेल्या सशाच्या नजरेनें, क्षणांत सुभेदाराच्या विचारी चेहऱ्याकडे, तर क्षणांत फकिराच्या गूढ, गंभीर, उदासीन मुद्रेकडे आळीपाळीनें पाहूं लागली.

—पण हें संकट टळण्याला कांहीं उपाय आहे असें आपणास वाटतें का ?—सुभेदारानें चिंतागर्भ उत्सुकतेनें विचारलें.

—राज्यावरील संकट निवारण्यास एकच उपाय आहे; पण तो भयंकर आहे—फकीर करुण स्वरांत सावकाश म्हणाला.

सुभेदाराचें हृदय धडधडलें. अमिनेच्या साऱ्या शक्ति कर्णेंद्रियांत स्थिर झाल्या.

फकिरानें सुभेदाराच्या तळहातावरील रेषा बारीक रीतीनें पुन्हा न्याहाळून म्हटलें:

—तुमच्या कुटुंबांतील एका व्यक्तीनें आत्माहुति दिली तर हें संकट खात्रीनें टळेल.

या भयंकर उत्तरानें त्या बापलेकीची काय अवस्था झाली असेल याची आपणच कल्पना करा. दोन्ही हातांत आपलें तोंड झांकून अमिनेनें तेथेंच रडण्यास सुरवात केली. सुभेदाराचें सर्वांग भीतीनें थंड पडलें. एका व्यक्तीनें स्वखुषीनें मृत्यु स्वीकारावयाचा! किती भयंकर शिक्षा ही! सुभेदाराच्या मनांत याच वेळीं पूर्वस्मृति उभी राहिली. दहा वर्षांपूर्वी त्याजागीं घडलेली एक गोष्ट त्याला आठवली. याच सारखा एक फकीर तेथें उतरला होता. त्यानें वर्तविलेलें भविष्य अचुक उतरे असें म्हणत. इतर लोकांप्रमाणें सुभेदारानें त्याला आपला हात दाखविला व नंतर आपल्या अठरा वर्षांच्या रहीमचा हात दाखवून त्यानें भविष्य विचारलें.

बापाच्या संगतीनें रहीमला ज्योतिषाचा नाद लागला होता. ज्योतिषावर त्याची उल्मुल्कपेक्षांही जास्त श्रद्धा बसली होती.

रहीमचा हात पाहून झाल्यानंतर त्या फकिरानें सांगितलें. आणखी दहा वर्षांनीं या राज्यावर एक संकट येईल, त्या वेळीं या मुलाच्या आत्माहुतीनें तें संकट टळेल.

हें भयंकर भविष्य ऐकून रहीमच्या कोंवळ्या, श्रद्धापूर्ण मनावर फार वाईट परिणाम झाला. दुसऱ्याच दिवशीं कोणाला न कळवितां तो बेपत्ता झाला. सुभेदारानें मुलाच्या शोधाप्रीत्यर्थ सतत दोन वर्षें आटोकाट

प्रयत्न केले; पण व्यर्थ! रहीम कांहीं सांपडला नाहीं. सुभेदाराची अशी खात्री झाली, कीं वेड्या रहीमनें आपल्या जिवाचा नाश करून घेतला. अमिना त्यावेळीं आठ वर्षांची होती. रहीमच्या विरहानें झुरून झुरून त्याची आई थोड्याच दिवसांत वारली!

सुभेदाराला वरील हृदयद्रावक इतिहास आठवला. पूर्वीच्या व आतांच्या, मिळून दोन्ही फकिरांनीं दिलेली संकटाची सूचना, व तें टाळण्याकरितां सांगितलेला भयंकर उपाय, हीं लक्षांत आणून त्याचें मन भयस्तिमित झालें.



वडिलांच्या व राज्याच्या सुखाकरितां,–स्वास्थ्याकरितां तळमळणारी अमिना मर्दन गडावरील आपल्या निवासस्थानाच्या एका उंच गच्चींत सचिंत मुद्रेनें बसली होती. त्या गच्चीवरून आसपासच्या दहावीस मैलांच्या टापूंतील प्रदेश दिसत होता. हिरव्याचार वृक्षराजी ज्यांच्या-वर सदैव चवऱ्या ढाळीत आहेत, असे डोंगर लहान लहान पुंजक्या-प्रमाणें दिसत होते. विस्तीर्ण मैदानांतून वाहणाऱ्या चकचकीत पाण्याच्या नद्या लहान निर्झराप्रमाणें शोभत होत्या. क्षितिजाला टेंकून एकामागें एक उन्नत होत जाणारे उत्तुंग पर्वत निरनिराळ्या रंगाचीं वस्त्रें परिधान करून उभे होते. जवळच्या रांगेंतील पर्वत हिरवे–काळे दिसत होते. नंतर, गडद निळ्या रंगाचे पर्वत डोकावून पहात. त्याच्या पलीकडे धूसर रंगाचे पर्वत पसरलेले दिसत. त्याच्याही पुढें निळ्या रंगावर सफेती दिलेल्या आकाशाच्या रंगांत विलीन होत जाणारे पर्वत दिसत आणि या सगळ्यांवर आकाशांतील बहुरंगी ढगांनीं चमत्कारिक छत्र धरलें होतें. इतका उदात्त व सर्वव्यापी देखावा तासचे तास नेहमीं पाहाण्यांत गढून जाणारी आमिना म्लान व भयाकुल मुद्रेनें मर्दनगडाखालीं पसर-लेल्या भयाण दरीकडे पहात होती.

फकिरानें काल सांगितलेलें भयंकर भविष्य अमिनेच्या डोक्यांत थैमान घालीत होतें. राज्यावरील संकट टाळण्याकरितां बाबा आतां आत्मत्याग केल्याशिवाय खात्रीनें राहाणार नाहींत. त्यांनीं स्वतःचा नाश करून

घेतला तर राज्याचा बचाव होईल खरा; पण मला या जगांत त्यांच्या-शिवाय प्रेमाचें दुसरें कोण माणूस आहे ? भाऊ लहाणपणींच पर-देशी झाला; आई वारली आणि हें सगळें दुःख थोडें म्हणूनच कीं काय, परमेश्वरानें आमच्यावर हा भयंकर प्रसंग आणला. याप्रमाणें तिच्या मनांत निरनिराळे विचार येऊन गेले. तिला बाप प्रिय होता; पण सुभ्याची अब्रु तिला कमी प्रिय होती असें नव्हे. अमिना म्हणजे किती बालिश स्वभावाची ! अठरा वर्षांची तरुणी, पण उल्मुल्कपाशीं तिचें वर्तन एकाद्या लहान मुलाप्रमाणें असे. बापाच्या मागें घोड्यावर बसणारी, त्याच्याबरोबर खेळणारी, हिरव्याचार डोंगरांच्या चौकटींत निसर्गानें बसविलेल्या चित्रांतील सुंदर स्थळांकडे बापाचें लक्ष वेधणारी अमिना; पण ती आज उल्मुल्कपेक्षांही गंभीर मनानें फकिरानें सांगितलेल्या भविष्याबद्दल विचार करीत होती. बाबांच्या ताब्यांतील कोंकणसुभा किंवा बाबा यांपैकीं कोणीतरी आपल्याला अंतरणार ! मग ?... तिला एक कल्पना सुचली व बऱ्याच विचारानंतर ती तिनें निश्चित केली. तेव्हां तिला समाधान वाटलें.

रात्र चांदणी होती. आकाशींच्या तारका सफ्फा मशिदीच्या तलावां-तील निळ्या पाण्यांत खेळत होत्या. मशिदीच्या आसपास पसरलेल्या झाडांच्या सांवल्यांमुळें सभोंवतालचा देखावा भयप्रद दिसत होता. सगळी-कडे अगदीं सामसूम होतें. अशा वेळीं, एक व्यक्ति तलावाच्या दिशेनें चालत आली. ती चालतांना मध्येंच थबके. मधूनच मागें वळून पाही व बऱ्याच अंतरावर चांदण्यांत दिसणाऱ्या मर्दनगडावर नजर रोंखी. तलावाकडे पोहोंचतांच पायऱ्या उतरून ती खालीं आली व पाण्याच्या अगदीं कांठावर उभी राहून तिनें मनांत देवाची प्रार्थना करण्यास सुरवात केली. इतक्यांत सफ्फा मशिदींतून कुणी तरी गंभीर, निश्चयात्मक व जोरदार आवाजांत म्हटलें: " मागें फीर ! "

आमिना दचकून एकदम मागें सरकली व तिनें मागें वळून पाहिलें. पुन्हां तोच आवाज कानीं पडला.

—अमिना, हा अविचार करूं नकोस. मागें फीर.

आणि लगेच तलावाच्या पायऱ्या उतरून एक आकृति अमिनेच्या जवळ आली. अमिनेनें भीति, आश्चर्य इत्यादि विकारांनीं व्याप्त होऊन म्हटलें:

—आपण कोण? माझा निश्चय मी पार पाडणार! आपण मला अडथळा करूं नये.

—तुझ्या सुखाची चिंता वाहणारा एक मनुष्य तुला सांगत आहे, कीं तूं हें धाडस करूं नकोस—त्या आकृतीनें अगदीं जवळ येऊन म्हटलें—राज्यावर आलेलें संकट तुझ्या मृत्यूनें टळणार नाहीं. परमेश्वराची इच्छा असेल त्याप्रमाणें घडून येईल. जिच्या मृत्यूनें हें संकट टळावयाचें आहे, ती व्यक्ति योग्य वेळीं आपलें कर्तव्य बजावल्याशिवाय राहणार नाहीं.

अमिनानें त्या आकृतीला ओळखलें व आदरानें तिनें आपले गुढघे जमिनीला टेंकले. तिच्या समोर मशिदींतील तेजःपुंज फकीर उभा होता. त्याच्या शब्दांत तिला दिव्य जादू दिसून आली. तिचा निश्चय बर्फाप्रमाणें विरघळून गेला. तो फकीर आपला हितकर्ता आहे असें तिला वाटलें.

—पण हें संकट टळेल ना?—अमिनेनें केविलवाण्या मुद्रेनें व काकुळतीच्या स्वरांत विचारिलें.

—होय टळेल ... खात्रीनें टळेल—त्यानें आत्मविश्वासपूर्ण स्वरांत उत्तर केलें. तो फकीर आणखी पुढें सरकला. अमीना मंत्रमुग्धाप्रमाणें तिथेंच उभी होती. संकट टळेल पण तें कोणाच्या मृत्यूनें टळेल याचा ती विचार करीत होती. फकिरानें तिचा उजवा हात धरला. अमीना चमकली. तिचें सर्वांग रोमांचित झालें. पण फकिराच्या हातून आपला हात सोडवून घेणें तिला सुचलें नाहीं. उलट, तशा त्या बिकट स्थितींतही त्याच्या हस्तस्पर्शानें कोणत्या तरी अननुभूत, मधुर भावनांचा आपण आस्वाद घेत आहों, असें तिला वाटलें. तिनें स्निग्ध, प्रेमळ स्वरांत म्हटलें:

—आपण कोण तें मला कळेल का?

— मी कोण तें सांगूं का — तो फकीर थांबला. नंतर त्यानें म्हटलें — पण नको. लवकरच तुला सगळें कळून चुकेल.

इतकें म्हणून त्यानें तिचा हात सोडला.

झालेल्या गोष्टीबद्दल स्तिमित मनानें विचार करीत अमीना व तो फकीर तेथून अदृश्य झालीं.



अमिनेनें भीत भीतच रात्रीं घडलेला सगळा प्रकार उल्मुल्कला सांगितला. आपली लाडकी अमिना एका संकटांतून वांचविल्याबद्दल त्यानें मनांतल्या मनांत त्या फकिराला व परमेश्वराला कितीतरी धन्यवाद दिले. अमिनेच्या जीवत्यागानें हें संकट टळणार नाहीं हें ठरलें. मग आपल्याशिवाय कुणाच्या आत्माहुतीनें तें टळेल याचा खुलासा करून घेण्याकरितां, दुसरे दिवशीं, अमिनेला बरोबर घेऊन उल्मुल्क सफ्फा मशिदीकडे येण्यास निघाला. वाटेंत आपल्या क्षीण नजरेनें त्यानें सभोंवतालच्या वैभवसंपन्न देखाव्याकडे नजर फेंकली. विस्तृत शेतांतून, नारळींच्या भरगच्च बागांतून वळणें घेत जाणारी 'जुवारी' नदी स्फटिकाच्या खवल्यानीं युक्त अशा रजतसर्पाप्रमाणें दिसत होती. पिकलेल्या शेतामुळें, सुवर्णोदकाचा सडा सगळीकडे घातला आहे असा भास होत होता.

मशिदीकडे पोहोंचतांच उल्मुल्क अमिनेसह त्या धर्मशाळेंत शिरला पण तेथें त्याला तो तरुण फकीर दिसला नाहीं. त्याच्या कांहीं पोथ्या व सामान जमिनीवर पडलेलें दिसलें. फकीर सफ्फा मशिदींत असेल म्हणून उल्मुल्क मशिदींत गेला; पण तेथेंही तो त्याला दिसला नाहीं. तो कुठें असेल या विचारांत उल्मुल्क आहे इतक्यांत तलावाच्या बाजूनें कांहीं गलबला ऐकूं आला. सुभेदारानें बरोबर असलेल्या नोकरास चौकशी करून येण्यास सांगितलें. घाबरलेल्या मुद्रेनें नोकर लौकरच परत आला व त्यानें थरथरत म्हटलें:

— धनीसाहेब! धर्मशाळेंतला फकीर तलावाच्या पाण्यांत मरून पडलेला आहे!

ही बातमी ऐकतांच अमिनेनें किंकाळी फोडली! उल्मुल्कचें हृदय धडधडलें, व त्याच्या डोळ्यांतून अश्रुप्रवाह सुरू झाला. आपला एखादा जवळचा आप्तेष्ट मृत्यु पावल्याइतकें त्याला दुःख झालें.

थोड्या वेळांत त्या अज्ञात फकिराचें प्रेत मशिदीपुढें आणण्यांत आलें. उल्मुल्क व अमिना यांनीं जोराचे हुंदके देत त्या शवापुढें गुढघे टेंकून त्याला अंतःकरणपूर्वक प्रणाम केला. फकिराच्या वस्त्रां-तून पाणी निथळत होतें. केंसावर व दाढीवर पाण्याचे थेंब मौतिक बिंदूप्रमाणें चकाकत होते. व त्याच्या गंभीर मुद्रेवर स्मिताची लकेर झळकत होती.

उल्मुल्कच्या तोंडून दुःखोद्गार निघाले: "केवढा धर्मात्मा!"

अमिना स्फुंदत होती. उल्मुल्क आश्चर्य, दुःख व भय यांनीं मूढ होऊन गेला होता.

फकिराच्या गळ्यांत सोन्याचा एक सुंदर ताईत दिसला. तो सुभे-दारानें काढून घेतला व त्या फकिरासंबंधीं कांहीं तरी अधिक माहिती मिळेल, या उद्देशानें त्यानें तो उघडला. ताईतांतून कागदाची एक घडी बाहेर पडली. अधीर अंतःकरणानें सुभेदारानें तो कागद उघडला व डोळ्यांपुढें धरला: "मी, तुमचा दुर्दैवी मुलगा रहीम, तुमच्या सुभ्या-प्रीत्यर्थ आज आत्मार्पण करीत आहें. दहा वर्षांपूर्वी इथें आलेल्या फकिराचें भविष्य आज खरें ठरत आहे!" वरील शब्द वाचतांच उल्मुल्क बेशुद्ध होऊन पडला. अमिना गलितधैर्य होऊन आक्रोश करूं लागली.



येथें तो मुसलमान थांबला. त्यानें एक दीर्घ निश्वास टाकला व म्हटलें:

—वरील गोष्टीला सहाशें वर्षें झालीं. परंतु त्या धर्मात्म्याचा स्मृतिदिन या मशिदींत मुसलमान लोक अजून साजरा करतात. येथून मुसलमानी सत्ता नष्ट झाली व आज आपण पोर्तुगीज सत्तेखालीं आहों. परंतु, येथील मुसलमान समाजाच्या हृदयावर त्या धर्मात्म्याची सत्ता

अजून चालत आहे. तुम्ही पाहिलेली ती मोठी कबर व ती कुबडी त्या फकिराची असल्यामुळें सगळ्यांना ती आदर स्थान होऊन राहिली आहे.

आम्ही त्या मुसलमानाचे आभार मानून खिन्न अंतःकरणानें चालूं लागलों. वाटेंत प्रभा म्हणाली :

—भविष्याबद्दल फाजील विश्वासच त्या फकिराच्या मृत्यूला कारण झाला असें मला वाटतें.

—असेल. पण त्यानें केलेला त्याग असामान्य होता. मी त्याला हुतात्मा किंवा पोर्तुगेजींत बोलावयाचें झालें तर Martir असें म्हणेन.

७–२–१९३१.

**कल्पवृक्षांच्या छायेंत**
प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई

# तुटलेली तारका !

तो प्रसंग आठवला म्हणजे अजून देखील माझी वृत्ती थिजल्यासारखी होते, हृदय दुःखानें भरून येतें व वाटतें, कीं आम्हीं माणसें कीं जनावरें ?



—कुणाची वाट पाहतां ?

—मला सांखळीला जायला मोटार हवी.

—सांखळीची मोटार गेली. आतां रात्र झाली. आज आणखी मोटार जाणारी नाहीं.

—मग मी अडचणींत सांपडलों.

—कसली अडचण ?

— मी इथें नवीन आहें. मी कुणालाच ओळखत नाहीं इथं.

— कांहीं हरकत नाहीं. हें घर आपलंच आहे.

माझ्याकडे बोलणारी व्यक्ति पंधरा वर्षांची एक अनोळखी तरुणी होती. तिच्या घराबाहेरच सांखळीला जाणाऱ्या मोटारी थांबत. म्हणून मी तिच्या दारांत राहून मोटारीची वाट पाहात होतों. रात्र पडली होती. गांव अनोळखी. खाणावळीची सोय देखील नव्हती. कुठें रहायचें ह्या विचारांत होतों. इतक्यांत त्या तरुणीनें मला राहायला सांगितलें. पण तिच्याकडे बारकाईनें पाहातांच माझें हृदय धडधडूं लागलें !

ती फार नाजूक अन् सुंदर दिसली. इतकी मधुर, सोज्वळ मुलगी मी क्वचितच पाहिली होती. पण कुसकरलेल्या फुलासारखी. पिसें हिरावून घेतलेल्या पांखरासारखी. डोळे मूळचे हंसरे, पण आतां दैन्यानें, कारुण्यानें भरलेले. गंभीर वृत्तीचीं माणसें दुःखांत सांपडलीं म्हणजे तितकीं भयाण दिसत नाहींत. पण ज्यांची वृत्ती फुलांसारखी नाजुक, हळुवार, सदा आनंदी, त्यांना दुःखी पाहिलें म्हणजे हृदय फाटून जातें. कारण ती भयाणता असह्य असते. तसेंच तिचें झालें होतें.

ती अगदीं कृश झाली होती. करपून गेली होती. केंसांचा भरदार विपुल अंबाडा मात्र बारीक मानेवर रुळत होता. चेहऱ्यावर मोहकपणा होता, दैन्य होतें, तेजाची विरळ छटाहि चमकत होती. पण तिच्या अंगावर कोणतेंच सुवर्णभूषण नव्हतें. वैभवसंपन्न आयुष्याला साजेसारखी तिची नाजूक काया उकिरड्यांत टाकून दिल्याप्रमाणें वाटत होती.

पण तिच्या खांद्यावर एक जीवंत भूषण होतें. पण भूषण कसलें तें ? डागच तो. काळें कुळकुळीत सहा महिन्यांचें पोर ! तें देखील कृश अन् रडवें ! किती भयंकर हा विरोध ! ती फुलासारखी अन् तें पोर कोळशासारखें ! पण फुलाच्या पोटीं कोळसे निपजावे अशी आमची करणी. त्याला कोण काय करणार ?

ती वेश्या होती हें निश्चित. कारण आपलें दैन्य निर्लज्ज्यपणें इतर पुरुषांना सांगणें वेश्यांशिवाय कुणाच्या नशिबीं असतें ?

तिच्या चेहऱ्यावरील भाव कुलीन, विनयशील तरुणीला साजेसारखे होते. पण तिचे शब्द वेश्येला अनुरूप असे होते. भाव एक आणि शब्द निराळे! हृदय एक आणि कृति निराळी! काय ही त्यांची स्थिति! पण काय करणार? वेश्येच्या जातींत जन्म!...

मला तिची अतोनात दया आली. तिच्या त्या नजरेंत, चेहऱ्यावरील गूढ भावांत, मला कोणतातरी विदारक इतिहास सांठला आहे असें वाटलें. माझे इतर विचार नष्ट झाले व तिचें आयुष्य समजून घेण्याची मला उत्कट इच्छा झाली.

—आंत जाऊन बसूं ना—तिनें म्हटलें.

—हो—मी तिच्या मागोमाग आंत गेलों. एकच विचार त्रास देऊं लागला. ही गरीब गाय. कसायांच्या हातांत सांपडली आहे. पण हे कसायी कोण? ...

तिनें मला एका खोलींत नेलें. मेजावर दिवा जळत होता. खोलींत बरेंच लांकडी सामान होतें. तसबिरा होत्या, पलंग होता, कांहीं वीणकाम होतें. पण त्यावर दैन्य पसरलें होतें. व्यक्तींवर त्याचप्रमाणें वस्तूंवर देखील गरिबी आपली काळी सांवली पसरते काय? ...

मी एका खुर्चीवर बसलों. खालीं जमिनीवर सतरंजी टाकून तिच्यावर ती बसली. माझ्याबद्दल इतका आपलेपणा तिनें कां दाखवावा? हृदयाहृदयांतून अज्ञात असें आकर्षण घडत असतें काय? माझें मन तिला कळलें नव्हतें. तिच्या स्थितीबद्दल माझ्या मनांत उत्पन्न झालेला कळवळा मी अजून उघड केला नव्हता. मग, एकाद्या बहिणीप्रमाणें माझ्यानजीक येऊन ती बसली हें कां? पण ती कलावंतीण ना?.... पण ती कलावंतीण असली तरी तिच्या बोलण्यांत, चेहऱ्यांत, नजरेंत मला कोणताच वाईट हेतु दिसला नाहीं. साधेपणा, सरळपणा हाच मला प्रमुख भाव दिसला. आपल्यासंबंधीं कांहींतरी रहस्य सांगण्याचा तिचा हेतु असावा काय?...

मूल रडतच होतें. ती त्याला शांत करण्याचा प्रयत्न करीतच होती. पण, तें घटकेघटकेला चवताळत होतें आणि ती कंटाळत होती.

— फारच त्रास देतें तुम्हाला हें मूल.

— काय करणार ? आपल्या इच्छेप्रमाणें काय घडतें ?

— तुम्हीं आजारी दिसतां.

— हें पाहा. तुम्हीं मला परकी. पण तुम्हांला पाहून आतां मला असें वाटूं लागलें कीं माझें गुदमरत असलेलें मन तुमच्यापुढें उघड करावें. माझी सगळी कहाणी तुम्हाला सांगून टाकावी. इतरांना ती मी कशी सांगूं ? लोक मजा करायला येतात अन् मला खोट आहे.

— तुमचें नांव काय तें मला सांगाल ?

— माझें नांव तारका...पण तुटलेली !

— अन् तुटून दगडांत पडलेली...

— दगड बनलेली...

— तारका ! सांग तुझी हकीकत. तुला कोणी नात्याचं माणूस नाहीं असें वाटतें. पण मी तुझा भाऊ आहें असें समज आणि तुझें मन उघड कर.

तिचे डोळे अश्रूंनीं भरले, गळ्यांतून हुंदके येऊं लागले. तिनें अश्रू टिपले, हुंदके दाबले, मुलाला पाळण्यांत टाकलें आणि बोलायला सुरवात केली.

जग अंधारांत गुरफटलें होतें. झाडें भुतांप्रमाणें भयाण दिसत होतीं. परमेश्वरानें उत्पन्न केलेले प्राणी कर्णकटु आरडत होते आणि तारकांप्रमाणें तेजस्वी असलेली ती तारका डोळे पुशीत, हुंदके दाबीत बोलत होती.



लहानपणापासून मी माझ्या मामाकडे वाढलें. मामा सरकारी कामदार होता. त्याला मूलबाळ नव्हतें. मला थोरली बहीण होती. मामाचा आग्रह झाला अन् मी त्याच्याचकडे राहूं लागलें.

मामी फार प्रेमळ बायको होती. तिनें मला मुलीप्रमाणें वागविलें. मला लिहायवाचायला शिकविलें. विणकामाची माहिती दिली, थोडेंफार गायला शिकविलें. माझें आयुष्य त्यांच्या सहवासांत फार मजेंत,

आनंदांत गेलें....माझी थोरली बहीण अकस्मात मुंबईला गेली. पैशाचा मोह...आईनें मामाला कळविलें, कीं तारकेशिवाय आपण एकटी कशी राहूं? आपलें उतार वय. देवीची सेवा कोण करील? घर कोण संभाळील?....मामा मामी रडलीं अन् एक दिवस मी आईपाशीं आलें, अन् त्या दिवसापासून जग म्हणजे काय हें मला कळूं लागलें.

माझा जन्म कलावंतीणीच्या पोटीं झाला. पण माझें बालपण सगळं मामाच्या सुशील संगतींत गेलें. यामुळें, तेरावें वर्ष लागून मला तारुण्य प्राप्त व्हायला आलें तरी मी मनानें अगदीं लहान मुलासारखी, साधी, सरळ, निष्पाप होतें. वेश्येच्या हिडीस आयुष्याची मला कल्पना नव्हती. शेंस म्हणजे काय हें मला माहीत नव्हतें. नीति म्हणजे काय व अनीति म्हणजे काय या गोष्टी मला अज्ञात होत्या.

आई म्हणे: "तारकेला आतां शेंस घातली पाहिजे."

आणि त्या वेळीं मला वाटे, शेंस म्हणजे वेश्यांचें लग्नच असेल!

मला अजून न्हाण आलें नव्हतें. पण मला शेंस घालण्यांत आली. लग्नांत नवरा असतो. शेंसेंत नवरा नाहीं हें कसें? मला हें कोडें पडलें. समारंभ मोठा झाला. माझें कोडकौतुक पुरविण्यांत आलें. पुढच्या गोष्टी माझ्यापासून गुप्त राखण्यांत आल्या. मला कांहींच कल्पना नव्हती. शेंस हा केवळ धार्मिक विधी. त्यानें माझ्या आयुष्यांत क्रांति केली असें मला वाटलें नाहीं. कारण मी पूर्वीप्रमाणेंच खेळत होतें, बोलत होतें.

एक दिवस मी आईला विचारलें: "आई, माझी शेंस घातली ना ग?".

—हो!

—शेंस म्हणजे काय ग?

—तूं पाहिली नाहींस का?

—पण कां घालायची ती?

—आमच्यांत शेंस घालतात. शेंस घातल्यानंतर...

—नंतर काय होतें ?

—नंतर, लोक येतात, पैसे मिळतात.

—लोक कां येतात अन् पैसे कां देतात ?

—तारे, अगदींच वेडी ! तुला कांहींच कळत नाहीं ! लहानलहान पोरींना सगळें सगळें कळतें. पण तूं न्हातीधुती झालीस, तरी...

—आई ? काय कळत नाहीं मला ? मला पुस्तकें वाचायला येत नाहींत का ? गाणीं म्हणायला येत नाहींत का ? जेवण करायला दिखील येतें मला ! माझ्यासारखें विणकाम तुला दिखील नाहीं यायचें ! अन् तूं म्हणतेस, मला कांहीं कळत नाहीं म्हणून ?

—तुला सगळं कळतं, पण कांहींच कळत नाहीं...

—असें काय बोलतेस तूं आई ?

—आम्ही वेश्या. आमचा धंदा, आमचें कर्तव्य ..

—कसला धंदा वेश्यांचा ?

—कळेल तुला थोड्या दिवसांनीं.

आई जास्त बोलली नाहीं. पण माझ्या मनांत कोणती तरी हुरहूर उत्पन्न झाली. वेश्यांचा धंदा. वेश्यांचें कर्तव्य ! ...काय असेल हें ?... कांहींतरी वेगळें असेल हें खचित. लोक येतील, पैसे मिळतील. कां येतील लोक ? कां.. ?

मला निश्चित कांहींच समजेना. मी गोंधळांत पडलें. माझी वृत्ति पालटूं लागली. माझा आनंद कमी होत गेला. मी विचारी बनलें...

थोड्याच दिवसांनीं मला कळून आलें कीं, वेश्येच्या घरांत पुष्कळ लोक येतात, जातात. त्यांच्याशीं तिचा संबंध असतो. पण, त्या संबंधाविषयीं मला कांहींच स्पष्ट कल्पना नव्हती.

शेवटीं एक दिवस, आई ज्या गोष्टीची वाट पाहात बसली होती, ती गोष्ट घडली. मला तारुण्य आलें. आणि त्या दिवसापासून आमच्या घरीं लोकांची जास्तच ये जा सुरू झाली. लोक माझ्याकडे टक लावून पाहायला लागले. कांहीं मला पाहून हंसूंही लागले. आईनें मला थोडथोडी माहिती द्यायला सुरवात केली.

आई म्हणत होती तें खरें होतें. तिच्या धंद्यांत मीं खरोखर अज्ञानी होतें हें मला कळूं लागलें.

आई म्हणे : "तारके, तूं आतां वाढलीस!"

—आई! काय म्हणतेस तूं हें! असें तूं म्हटलेंस म्हणजे मला वाईट वाटतें बघ.

—मी खोटं सांगितलें का? आतां लोक येतील...पैसे देतील...!

—काय म्हणतेस, आई? कां येतील लोक? कां? सांग ना मला?

—तुझ्या करतां येतील...

—माझ्याकरतां?...लोकांचा काय संबंध माझ्याशीं?

—किती वेडा प्रश्न!

—मी नेहमींच वेडी राहीन. असलें शहाणपण मला नको!

—पण तें कसें होईल! आम्ही वेश्या!

—वेश्यांनीं काय केलं पाहिजे?

—वेश्यांनीं लोकांशीं व्यवहार ठेवला पाहिजे.

—आई! व्यवहार, संबंध! मला कांहींच कळत नाहीं!......

—काय कळत नाहीं? तूं समजून घेत नाहींस.

—काय समजून घेऊं मी? मी वेश्या...इतरांप्रमाणें वेश्याच कां?

—वेश्येची मुलगी तूं! वेश्याच...

—मामीदेखील वेश्याच का?

—नाहीं. ती लग्नाची बायको...

—ती लोकांशीं व्यवहार, संबंध ठेवते कां?

—नाहीं! तिचा नवरा आहे ना?

—आणि मी...?

—तूं माझ्याप्रमाणें. आम्हांला नवरा नाहीं...

—म्हणून का आमच्या घरांत लोकांना येऊं जाऊं द्यायचें?

—हो...

—मला आवडत नाहीं हें!

—न आवडून काय उपयोग? देवीला आवडतें ना? मला आवडतें ना...?

मी त्या दिवशीं पुष्कळ रडलें. संकटाची स्पष्ट कल्पना नसतांना रडलें. पण माझ्या आयुष्याचें कांहींतरी भयंकर होणार, असा मला भास होऊं लागला. माझ्या आयुष्याचें कांहीं तरी वेगळें होत आहे एवढें मला कळूं लागलें.

दोनतीन दिवसांनंतरची गोष्ट. मी आंत कांहीं वाचीत बसलें होतें. मी आईची हांक ऐकली अन् बाहेर गेलें. पण तें दृश्य पहातांच दचकन् उभी राहिलें.

आईच्या शेजारीं एक इसम बसला होता. काळा कुळकुळीत, चेहरा भयाण, शरीरानें लठ्ठ अन् खूपच उंच. मिशांचे कल्ले रानाप्रमाणें माजलेले. डोळे मोठे बटबटीत. वय पस्तीशीच्या पलीकडे.

त्याच्यावर नजर जातांच मी दचकून उभी राहिलें. मीं मान खालीं घातली. माझें हृदय उडूं लागलें.

—तारके! भितेस कां अशी! जवळ ये ना—आई म्हणाली आणि मी आईच्याजवळ गेलें. गाय वाघापुढें जाते तशी गेलें.

तो मला पाहून हंसत होता. मी मनांत रडत होतें. आईचा हेतु मला समजला...

—तारके! यांना लाजायचें नाहीं आतां—आई म्हणाली.

मी भयानें अर्धमेली झाली होतें अन् आईला वाटत होतें, मी लाजतें म्हणून....

—तारका, फार सुंदर नांव अन् फार सुंदर रूप, कस्तुराबाई! तुमची मुलगी कुणालाही पसंत पडेल....

तो हंसत होता. आई डुलत होती. माझें सुख पाहात होती ना ती! मग माझ्याकडे लोक यायला लागले, माझी स्तुति करूं लागले हें पाहून तिला कां आनंद होऊं नये?

—तारे, आंत जाऊन विडा घेऊन ये ना तबकांत?

मी आंत गेलें. पण आंतच राहिलें. आईनें फिरून हांका मारायला सुरवात केली:

— तारके ! काय करतस आत ?

तारका आंत रडत होती. पण आईला वाटत होतें, तारकेनें हंसावें, नाचत उडत बाहेर यावें, गृहस्थाला विडा द्यावा, त्याला खूष करावा, त्याच्यावर नजर फेंकावी.

पण, मी इच्छा नसूनही बाहेर आलें. विडा दिल्यानें जर आईचें समाधान होतें, त्या गृहस्थाची कटकट नाहींशी होते तर काय हरकत आहे विडा द्यायला ?

मी तबक नेऊन आईकडे दिलें. आईनें माझ्या हातांत दिलें, व मला त्या गृहस्थाच्या समोर लोटीत म्हटलें :

— दे त्यांना विडा.

मी हातांत विडा धरला व कांपऱ्या हातानें त्या गृहस्थाच्या पुढें केला.

त्यानें विडा घेतला. पण तो घेतांना माझ्या बोटांना स्पर्श केला.

सर्पदंश झाल्याप्रमाणें मला वाटलें, मी दचकून मागें सरलें. माझ्या अंगाला घाम सुटला. तबक माझ्या हातांतच होतें.

नाण्याचा आवाज झाला ! तबकांत एक मोहोर चमकत होती ! आईचे डोळे आनंदानें चमकत होते. माझे डोळे अश्रूंनीं चमकत होते. 'लोक येतील, पैसे देतील' असें आई म्हणत होती तें हेंच का ?

मी त्या विचित्र स्थितींत विचार करीत होतें.

आई म्हणत होती तें खरें होतें. मी वेडी होतें. 'लोक येतील' ह्या शब्दाचा खराखुरा अर्थ अनुभवानें मला कळावयाचा होता.

पण तो अनुभव ! किती भयंकर तो अनुभव !

ती काळरात्र आली. एखाद्याच्या विरुद्ध कट करण्यांत यावा, त्याप्रमाणें आई इतर बायकांशीं कुजबुजत असे. मी दृष्टीस पडतांच बोलणें थांबे. घरांत एक प्रकारचें भयाण वातावरण पसरलें होतें.

या खोलींत तो इसम आधींच येऊन बसला होता. मला हें माहीत नव्हतें. आईनें मला खोलींत जायला सांगितलें. मी आलें. आणि लगेच आईनें बाहेरून दार ओढून घेतलें.

तो इसम लगबगीनें पुढें झाला व त्यानें दाराला आंतून कडी घातली. माझी स्थिति मी काय वर्णन करूं ? एका भयाण विवराच्या तोंडाशीं लोंबकळत असल्याप्रमाणें मला वाटलें. या राक्षसाच्या ताब्यांत कां दिलें मला आईनें ? मला विहिरींत टाकावयाची होती...मान चिरायची होती...पण....

मी दाराशींच चटकन् बसलें व मान गुढघ्यांत घालून रडूं लागलें ! मला जगांत कोणीहि नव्हतें ! माझी आई, माझी प्रेमळ आईच माझी शत्रु ठरली ! असें कां व्हावें ?

माझ्या भोंवतालचें जग फिरत आहे असें मला वाटत होतें. जग कसें असतें, हें मला त्या वेळीं कळलें.

मी रडतच होतें. आईला प्रतिकार करण्याची शक्ति मला कुठली ?

तो माझ्याजवळ आला व बसून त्यानें म्हटलें :

—तारके ! असें कां रडायचें हें.

आणि त्यानें चार सोन्याचे बिलवर माझ्या हातांत दिले. पण ते जमिनीवर पडले व त्यांचा निनाद झाला !

'लोक येतील, पैसे देतील !' आईचें म्हणणें !

त्यानें माझा हळूच दंड धरला. मला तें दुःख असह्य झालें. मला घेरी आली.



त्या राक्षसाच्या सहवासांत मी एक महिना काढला. या सुमारास माझी आई तापानें वारली आणि मी त्याचा संबंध तोडला...

आणि नंतर हें मूल !

सध्यां मी काय करतें तें कळत नाहीं. काय करावें तें कळत नाहीं.

पोटाकरतां कांहीं तरी करतें....पण दगडाप्रमाणें...

मला हृदय आहे कीं नाहीं हेंच मला कळत नाहीं.

१०—२—३४

**कल्पवृक्षांच्या छायेंत**
प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई

# जीवन संगीत

घरच्या कोंबड्यांचा साद कानावर पडतांच गोंदू अगदीं पहांटेला अंथरुणावर उठून बसला. त्याचें अंथरूण कसलें तें? शेणानें सारवून गुळगुळीत केलेल्या जमिनीवर तो झोंपत होता. पांघरण्याकरितां एक काळी कांबळ, उशाला एक लांकडाचा चौकोनी तुकडा, ही त्याची निजण्याची नेहमींची व्यवस्था!

त्यानें काढी ओढून पणती पेटविली. विडी पेटवून तिचे चार झुरके मारले व त्याची नजर अस्ताव्यस्त पडलेल्या आपल्या पोरांकडे गेली. थोरली नमू गुरांची व्यवस्था करतांना श्रमली असेल, मधली गजू घरकामामुळें त्रासून गेली असेल व धाकटा पोर गुरांच्या मागें, डोंगरावरून वणवण फिरला असेल! असा विचार त्याच्या मनांत आला व त्यांच्या

अंगावरील अस्ताव्यस्त झालेलीं पांघरुणें त्यानें हलक्या हातानें नीट केलीं.

आणि निरूवर त्याचे डोळे स्थिर झाले, तेव्हां त्यांत कौतुकाची चमक उत्पन्न झाली. त्याचें हृदय सूक्ष्म आनंदानें भरून आलें. दिवसभर ती संसाराकरितां कशी झटते? नेहमीं आनंदी, थोडक्यांत संतुष्ट व किती हंसत मुख! अंगाखांद्यानें कशी धष्टपुष्ट व कष्टाळु. त्याच्या मनांत विचार आला आणि त्या निजलेल्या चारहि जीवांना पाहून त्याला वाटलें, आपण किती सुखी आहों!

मुलांना चाहूल लागून तीं उठतील म्हणून तो दार हळूच उघडून बाहेर आला. वाड्यावरचे कोंबडे जोरजोरानें आरवत होते. अंगणांतल्या पोपयीच्या पानांवर दंवाचे थेंब ठिपकत होते. आकाशांत चंद्राची कोर अजून रेंगाळत होती.

तो गोठ्यांत आला व त्यानें आपल्या बैलांच्या पाठीं प्रेमानें थोपटल्या. त्यांचीं दावीं सोडलीं. त्यांना बाहेर आणलें. ओट्याच्या कोपऱ्यांत नांगर ठेवला होता, तो त्यानें खांद्यावर टाकला व बैलांच्या मागोमाग तो आपल्या शेताच्या दिशेनें चालूं लागला.

शेताच्या बांधावर पोंहचतांच त्यानें नांगर खालीं ठेवला व शेतावर नजर फिरविली. महिन्याच्या आंत ही सगळी जमीन नांगरून, पाणी घेऊन व बीं पेरून तयार होईल कीं नाहीं हा विचार त्याच्या मनांत उद्भवला.

मागील वर्षांत गोंदू त्या शेताची अर्धी जमीन खंडाला करी. पण यंदा त्यानें ती सगळीच केली होती. नेहमीं आपण कष्ट केले, पण बायकोच्या अंगावर सुतळीचा तोडा नाहीं, मुलांच्या पायांत रुप्याचा वाळा नाहीं, यंदा जास्त खपायचें, जास्त त्रास काढायचे, पण सगळें शेत खंडाला करायचें, अन् आपली इच्छा पुरवायची.

थंडी कडाक्याची पडली होती. पाण्याला शिवायची कांहीं सोय नव्हती. शेताच्या त्या अरुंद पट्टीच्या पलीकडे पोपयीचीं उंच झाडें दिसत होतीं व त्यांच्यामागें लहानशी टेकडी उभी होती. उजव्या

हाताला कांहीं अंतरावर गांवचें चिमुकलें देऊळ दिसत होतें व त्याच्या लगतच्या लगतच छोटासा तलाव होता.

गोंदू उभा होता त्या बांधावर रांगेनें माड लावले होते व बांधाच्या खालीं ओहोळ वाहत होता.

गोंदू शेतांत उतरला. त्यानें जोत बांधलें व त्या पाऊलभर पाण्यांत तो नांगर चालवूं लागला.

पिंजारलेल्या कापसाप्रमाणें सगळीकडे विरल धुकें पसरलें होतें. उजव्या हाताकडच्या शेतांत कोणाचाच शब्द ऐकूं येत नव्हता. शेताच्या कडेला असलेल्या कांटेरी झाडांतून 'कोंकाऱ्यां'चा कलकलाट चालला होता व वातावरणांतून एक एक बगळा येऊन शेताच्या 'मेरां'वर बसत होता.



अकरा वाजायला आले, तेव्हां निरू शेताकडे येतांना दिसली. तिच्या माथ्यावर पेजेचें मडकें होतें. डाव्या हातानें तिनें तें घट्ट धरलें होतें व उजवा हात खालीं सोडला होता. अंगाबरोबर नेसलेल्या वस्त्रा-मुळें तिच्या अवयवांचा भरींवपणा उठून दिसत होता. डोळ्यांत सुखा-समाधानाचें प्रतिबिंब खेळत होतें व चेहऱ्यावर स्मिताची लकेर नाचत होती.

निरू दृष्टीस पडतांच गोंदू जोत सोडून बांधावर आला. ओहळांत उतरून त्यानें अंग धुतलें व फिरून बांधावर येऊन माडांच्या सावलींत तो निरूजवळ बसला.

कांशाच्या ताटलींत उकड्या तांदळांची पेज वाढीत निरूनें उल्हसित मुद्रेनें विचारलें, " आज खूपच पहांटेला उठून आलांत तुम्हीं ? रात्रीं दिवेलावणीला घरीं यायचं व एवढ्या सकाळीं कामाला लागायचं, हें बरं नाहीं."

— निरू ! — त्यानें प्रेमळ स्वरांत म्हटलें — ही एवढी जमीन नांग-रून व्हायला नको का ?

— तुम्ही एकटे. एवढी मोठी जमीन करायची नव्हती खंडाला. गेल्यावर्षी लहान नव्हती का केली ?

—पण तेवढ्या जमिनीच्या उत्पन्नानं काय होणार? आज पांच वर्षें मी एकसारखा खपतों आहें ना, पण तुला एखादा दागिना केला का मीं? माझीं गुणीं पोरं अवघीं तीन! पण त्यांच्या हातांपायांत कांहीं घातलं कां? वापरायला चांगलीं वस्त्रं दिलीं कां? हें असं नेहमीं कुठवर चालू द्यायचं?

—तुम्हीं विनाकारण मनाला लावून घेतां हें! मला आपलं असं कधीं वाटलं नाहीं अन् तसं पाहिलं, तर आम्ही काय कमी सुखी आहों? दागिने नसले म्हणून काय झालं? आपण कष्ट करतां, त्यामुळं आम्हांला कधीं पोटाची पंचाईत पडली का? तिन्ही वेळां, न चुकतां, भरपूर जेवायला मिळतं, हें का थोडं झालं? एवढं तरी किती जणांच्या नशिबांत असतं? शेजाऱ्यांची स्थिति पाहिली म्हणजे मला आपलं वाटतं, कीं आम्ही त्यांच्यापेक्षां कितीतरी सुखी!

निरूनें पेज वाढली, केळीचें एक पान तोडून त्यावर 'सुर्णा'ची भाजी घातली व गुंडाळून आणलेले चार पांच पोळे काढून पानावर ठेवले.

पोळे पाहून गोंदूला फार आनंद झालासें दिसलें. त्यानें हंसत म्हटलें, "निरू, कां त्रास घेतलेस तूं हे? पोळ्यांशिवाय मला पेज चालत नव्हती का?"

—तुम्हांला आवडतात म्हणून केले. त्यांत काय मोठंसं!

—तसं नाहीं, पण या दिवसांत तूं जास्त श्रम करायचे नाहींस— गोंदू मिशांतल्या मिशांत हंसत म्हणाला. त्याचे डोळे कौतुकानें व आनंदानें चमकले.

निरूनें चटूकन् मान खालीं घातली. गोंदूनें दाखविलेली कळकळ पाहून तिला धन्यता वाटली. तिच्या हृदयांत कुणीतरी गुदगुदल्या करीत आहे, असें तिला वाटलें.

—आणखी चारपांच महिने जास्त काम नाहीं करायचं, समजलीस?— गोंदू म्हणाला—देवाची कृपा! धाकटा पोर गुरं राखायला गेल्यापासून दिवसभर तुझ्याजवळ तरी कोण आहे? रात्रीचा मी घरीं आलों, म्हणजे मला देखील ओकं वाटतं. निळू लहान होता तोंवर मला किती बरं वाटे!

आतां एखादं लहान मूल घरांत हवं असं वाटायला लागलं, तोंच देवानं इच्छा पुरी केली!

गोंदू संसारसुखांत तल्लीन होऊन बोलत होता. निरू त्याच्याजवळ बसून आनंदभरानें ऐकत होती. थोड्या वेळानें तिनें म्हटलें: " पण एवढी जमीन नांगरून–पेरून कशी होईल, ही मला चिंता ! "

— मी काय कमी आहें असं तुला वाटतं ? तुमच्या सुखाकरितां मी कांहींही करीन. तुमच्याकरितां केलेले कष्ट मला जाणवतच नाहींत मुळीं. सकाळपासून मी काम करतों आहें ना ? पण तूं आलेली पाहिली अन् किती बरं वाटलं !

— मी अजून देखील म्हणतें कीं, अर्धी जमीन तुम्ही दुसऱ्या कुणाला तरी द्यावी — निरू म्हणाली.

— छे, निरू ! असं नाहीं व्हायचं. तूं माझी लक्ष्मी ! माझ्याकरितां तूं काय कमी कष्ट करतेस वाटतं ! वाड्यावरच्या बायकांना मी ओळखतों ना ! काम जास्त म्हणून नेहमीं घरांत भांडणं ! पण तूं नेहमीं हंसतमुख ! कुणाकरितां करतेस तूं हें सारं ? माझ्याकरितांच नाहीं का ? मग तुमच्या-करितां एका वर्षापुरते मीं अधिक त्रास काढले तर त्यांत काय बिघडलं ! माहेराहून तूं पोवनांची गळसरी आणली होतीस, ती तूं माझ्या आजारांत विकून टाकलीस त्याची मला आठवण नाहीं वाटतं ?



बाकीचे शेतकरी कोस पाऊण कोस अंतरावर असलेल्या आपल्या घरांकडे जेवणाकरितां परतत होते आणि गोंदू शेताच्या बांधावर बसून बायकोशीं संभाषण करीत, पेज जेवीत होता.

— नमूला पाठविलं नाहींस तूं इकडे ? — गोंदूनें विचारलें.

— घरचं काम सोपवलं मीं तिच्यावर अन् आलें.

— फार गरीब अन् कष्टाळू पोरगी ती. चांगला नवरा शोधून काढला पाहिजे तिला.

—यंदा तिला बारावं वर्ष. यंदा तिचं लग्न झालं तर फार बरं !

— होय ना ? म्हणूनच मी यंदा हें एवढं शेत खंडाला केलं, सभ-

जलीस ? तूं अशी नसतीस तर तुला मी शेतांत राबविली असती. पण तूं धूर्त ! काम टाळण्याचा उपाय तूं शोधून काढलास ! --असें म्हणून गोंदू मनःपूर्वक हंसला.

पेज जेवल्यानंतर निरू रिकामें मडकें माथ्यावर घेऊन घरीं परतली व गोंदू माडांच्या सांवलींत विश्रांति घेत पडला.

सायंकाळपर्यंत गोंदू शेतांत काम करीत होता. पण त्याची वृत्ति अगदीं आनंदी होती.

आपण नांगरून काढलेली जमीन पाहून त्याचें त्यालाच नवल वाटलें. पाषाणाच्या उदरांतून स्वच्छ पाण्याचा झरा अविरतपणें वाहत असावा त्याप्रमाणें उत्साहाचा झरा आपल्या हृदयांतून निघून आपल्या सगळ्या अवयवांत चैतन्य व शक्ति ओतीत आहे, असें त्याला वाटलें.

सूर्य मावळला, जवळच्या शेतांतील शेतकरी घरांकडे परतले, तेव्हां गोंदूनें जोत सोडलें. बैलांना ओहोळावर आणून त्यांना धुऊन काढले, आपले पाय साफ केले, नांगर धुऊन काढला, देवळाकडे वळून देवाला नमस्कार केला व बैलांना हांकीत तो घराकडे परतला. वाटेंत निरू आणि आपलीं मुलें यांच्यासंबंधींचे निरनिराळे विचार त्याच्या मनाला आल्हाद देऊं लागले.

बैलांना गोठ्यांत बांधून तो घरांत शिरला तेव्हां त्याचीं तिघेंही मुलें त्याच्याभोंवतीं जमा झालीं. गोंदूनें त्यांना कुरवाळलें, त्यांची प्रेमानें चवकशी केली व मुलांचें सुख पाहून त्याला समाधान वाटलें.

तो आंत गेला, तेव्हां निरू चुलीजवळ होती. तो तिच्याजवळ एका पाटावर बसला. निरूनें नाचण्याची भाकरी व चटणी त्याच्यापुढें ठेवीत म्हटलें: " आज यायला किती उशीर केलात तुम्ही ? "

शेजारच्या घरांतून भांडणाची गडबड ऐकूं येत होती. एका घरांत नवरा दारू पिऊन बायकोला मारीत होता व तिच्या रडण्याचे स्वर त्या वेळीं भयानक वाटत होते. दुसऱ्या घरांत बायको नवऱ्याला दुरुत्तरें करीत होती व मुलें रडत होतीं.

आपल्या घरांतील शांतता व समाधान आणि शेजारच्या घरांतील

भांडणें व रडारड, यांतील विरोध पाहून त्याला आपलें सुख उत्कटतेनें जाणवलें. त्यानें मुलांजवळ निरनिराळ्या गोष्टी केल्या. शेताचें उत्पन्न अमुक येईल, आपण निरूला अमुक करूं, गजूला वाळे करूं, नमूला कपडे शिवूं इत्यादि सुखस्वप्नांत तो दंग झाला.

रात्रीचें जेवण झाल्यावर जेव्हां सगळीं मुलें स्वस्थ झोंपलीं, तेव्हां त्यांच्याकडे पाहून गोंदूला आपल्या जीवनाचें सार्थक होत आहेसें वाटलें. आणि निरू दिवे मालवून जेव्हां अंथरुणावर आडवी झाली, तेव्हां तिच्याजवळ जाऊन तिच्या पाठीवरून प्रेमभरानें हात फिरविण्याचा मोह त्याला टाळतां आला नाहीं!

२०-६-१९३४

# न्यायाधीश

म्हातारी मारियान आपल्या झोंपडीवजा घराच्या बाहेर पायऱ्यांवर बसली होती. जवळच्याच लांकडी खांबाला जाळ्याचें एक टोंक बांधलें असून हातांतील दाभणानें ती तें जाळें शिवीत होती.

ऊन कमी होत चाललें होतें. आसपासच्या घरांतील लोकांच्या मुद्रेवर भीतीचे, साशंकतेचे भाव पसरले होते, व जेथें तेथें दोन तीन बाया एकत्र जमून हळूच कुजबुजत होत्या. थोड्याच अंतरावर पसरलेल्या किनाऱ्यावर बांवूंच्या लांबच लांब काठ्यांवर ओळीनें जाळीं वाळत टाकलीं होतीं व किनाऱ्यावरील रेतींत कांहीं होड्या दिसत होत्या.

मारियानचें जाळें शिवण्याचें काम सफाईनें चाललें होतें. तरी पण मधून मधून कानोसा घेत, रस्त्याच्या बाजूला संभाषण करणाऱ्या इसमाकडे ती कुतुहलानें नजर टाकीत असे.

थोड्या वेळानें मारियानच्याच वयाची दुसरी एक म्हातारी तेथें आली. तिच्या गळ्यांत बांबूच्या कामटाचें एक वेटोळें असून त्यांतून ती सणाचें सूत तयार करीत होती. चालत असतांनाच ती दोन्ही हातांच्या तळव्यांनीं भोंवरी फिरवीत असे. कारोलिना दृष्टीस पडतांच मारियाननें मान वर करून म्हटलें: "कारोलिना, तूं बरी आहेस ना ? गेल्या तीनचार दिवसांत तूं इकडे फिरकली नाहींस."

—मेरीच्या कृपेनें बरीं आहों आम्ही !—कारोलिना तिच्याजवळ खालच्या पायरीवर बसत म्हणाली—पण पोरानें एक भांडण उपस्थित केलें. त्यामुळें तुझ्याकडे यायला मिळालें नाहीं.

—पेद्रूनें का ? मोठा मस्त पोरगा तो. पण मला तो भारी आवडतो, समजलीस. कसलें भांडण केलें त्यानें ? तो दिसला नाहीं या दिवसांत इकडे ?—मारियान क्षमाशील दृष्टीनें हंसत हंसत म्हणाली.

—मोठ्या त्रासांत घातलेंन त्यानें मला. आमचा शेजारी गुस्ताव याला ओळखतेस ना ?

—काय ? त्याच्याबरोबर तुझ्या पोरानें भांडण केलें ! जेजूस !—मारियाननें आश्चर्ययुक्त मुद्रेनें विचारलें व हातांतील दाभण बाजूला ठेऊन, तिनें हाताच्या बोटांनीं क्रॉसचें चिन्ह केलें.

—होय ग ! सैतान बसला ना त्या पोराच्या मानगुटीवर ! झालें काय ? तर गुस्तावचा एक डुकर आमच्या मळ्यांत शिरला. माझ्या पोरानें त्याचा पाय मोडून टाकला. मग गुस्ताव काय गप्प रहातो ? त्यानें आमचा मोठा डुकर त्याच दिवशीं बंदुकीनें मारून टाकला—कारोलिना सुस्कारा टाकीत म्हणाली. आपल्या डुकराची आठवण होऊन तिला वाईट वाटलेंसें दिसलें.

—मग काय झालें ?—मारियान उत्सुकतेनें म्हणाली. डुकर मारल्याबद्दल तिला देखील वाईट वाटलें.

—माझा पेद्रू संतापला व गुस्तावला मारायला धावूं लागला गुस्तावसारखा भयंकर मनुष्य गांवांत आहे का कोणी ? त्याच्याशीं शत्रुत्व केलें तर धडगत आहे का ? पण पेद्रूला त्याचें काय ? तो तरणा

ताठा पोर ! त्याला आवरण्याकरितां किती सायास पडले मला ! दोन दिवस त्याच्यावर पाळत ठेऊन घरीं राहिलें — एका मोठ्या संकटांतून सुटल्याप्रमाणें चेहरा करून कारोलिना म्हणाली.

— खरेंच कारोलिना, तूं फार बरें केलेंस. गुस्ताव म्हणजे 'माल्दिसांव' पडलेला मनुष्य. त्याच्याशीं भांडण करणें देखील महत्पाप आहे. तो किरिस्तांव तरी आहे का ? तो इगर्जीत 'मिसा'ला गेलेला कोणी पाहिलें नाहीं. त्याच्या घरांत म्हणे 'मारीये'च्या तसबिरा नाहींत व साहेबाचा 'क्रुझ' नाहीं — गुस्तावचें नांव घेणें देखील पाप आहे असें मानून मारियाननें तोंडानें धार्मिक मंत्र गुणगुणण्यास सुरवात केली.

— गांवांत रहाणें देखील भयाचें होऊन राहिलें ना ग ? तो केव्हां कुणाचा घात करील, केव्हां दरोडा घालील, कोणत्या कुमारिकेवर बलात्कार करील तें कांहीं सांगतां येत नाहीं. गांवांवर 'पॅस्त' पडली आहे ! गांवची शांतता गेली ! — कारोलिना त्राग्यानें म्हणाली.

— आजच्या खुनाची खबर तुला अधिक कांहीं कळली का ? — मारियान जाळें शिवण्याचें बंद करून म्हणाली. काम करून तिचे हात वळले होते, ते तिनें दोनतीनदां नेटानें झाडले.

— सगळें जग भरलें ना त्या हकीगतीनें ! आंतोनीसारखा सज्जन माणूस विरळा नाहीं ग ? किती देवमाणूस होता तो ! — कारोलिना दुःखपूर्ण स्वरानें म्हणाली.

— पण कुणी मारलें म्हणतात त्याला ? — मारियाननें साशंकतेनें हळूच विचारलें.

— लोक म्हणतात तेवढें आम्हांला ठाऊक. गुस्तावचें अन् आंतोनीचें कांहीं बिनसलें ...

— मी ऐकलें होतें कीं, गुस्ताव आंतोनीकडे कांहीं उसनवट रक्कम मागायला गेला. त्यानें नकार दिला. कारण गुस्तावनें त्याला पूर्वीचें कांहीं देणें होतें. आंतोनी श्रीमंत हें त्याला पक्कें ठाऊक होतें. रात्रीचा तो त्याच्या घरांत नकळत शिरला, निजलेल्या आंतोनीच्या गळ्यांतली

तिजोरीची चावी काढून घेऊन त्याला त्यानें ठार केलें व पैसे घेऊन तो पळाला...

ही हकीकत ऐकतांना दोघांहि बायांची मुद्रा केविलवाणी झाली. दोघींनींहि बोटांनीं क्रॉसची खूण केली व तोंडानें कांहीं गुणगुण केली.

— किती दुष्ट ग ? एवढ्याकरतां त्यानें आंतोनीचा घात केला ?

— दुष्टांना कारणें पाहिजेत का ? पैशाचा लोभ हें कारण का लहान आहे ? गेल्या वर्षी याच दिवसांत त्यानें आमच्या एका शेजाऱ्याला मरेपर्यंत मार दिला, तो कोणत्या कारणाकरतां ? गुस्तावनें त्याचेजवळ मासळी मागितली अन् त्यानें नाहीं म्हटलें, हेंच कारण !

— पण त्याचें पारिपत्य कोणी करीत नाहीं हें जास्त वाईट. कोणत्याच सत्तेला तो जुमानीत नाहीं.

— त्याचें पारिपत्य करणाऱ्यानें मरायला आधीं तयार झालें पाहिजे. आपल्या शत्रूचा तो केव्हां घात करील याचा कांहीं नेम नाहीं.

— सरकार देखील त्याला भितें. मग लोक तरी काय करणार ?

— इकडे मुंबईतल्याप्रमाणें गुप्तपोलीस आहेत का ? माझा मानू मला म्हणत होता कीं, मुंबईला कुणी कितीहि काळजी घेऊन चोरी केली तरी गुप्त पोलीस तिचा शोध लावतात. इथें तसें आहे का ? इथें पोलिसांना इतर लोकांनीं चोराचा शोध लावून दिला तरी तो चोर ठरायला किती सायास पडतात !

— गुस्तावला पोलिसांनीं पकडला नाहीं का अजून ?

— ते कसे पकडतील ? प्रत्यक्ष खून करतांना पाहिलेले साक्षीदार हवेत ना ? नाहीं तरी तितका सबळ पुरावा तरी पाहिजे. तो कुठें आहे ? गुस्तावच्या विरुद्ध साक्ष द्यायला कोण धजतें ? तो निरपराधी ठरून पोलिसांच्या हातून सुटला तर आपला घात केव्हां करील ही साक्षीदारांना भीति. सगळे लोक गुस्तावचे मनांतून शत्रु. पण बाहेरून त्याचे मित्र. त्याची मर्जी राखायला सगळे धडपडतात. अशा स्थितींत त्याला कोण पकडणार ?

इंग्रेजीची घंटा जोरानें वाजूं लागली. दोघीहि बाया भक्तिभावानें

उठल्या व इग्रेजीकडे पुढा करून त्यांनीं " Ave Maria " म्हण-ण्यास सुरवात केली. आसपासच्या घरांतून दिवे पेटूं लागले. रस्त्याच्या बाजूला असलेल्या मोठ्या दगडी क्रॉसाभोंवतीं मेणबत्त्या पेटूं लागल्या.

घंटा वाजण्याचें बंद होतांच त्या दोघीहि खालीं बसल्या. कारोलिना म्हणाली : " आतां जातें मी घरांत. वाट पहात बसतील माझी. "

—आणखी थोडा वेळ राहिनास. पेद्रु आहे ना घरांत ? तो पेटवील दिवे. आणखी थोडावेळ बोलूं. मग फिरून किती दिवसांनीं येशील कुणाला ठाऊक—तिला आग्रह करीत मारियान म्हणाली.

मारियानच्या मुलीनें घरांत दिवे लावले. देव्हाऱ्यांत मेणबत्त्या पेट-विल्या. मारियान व कारोलिना घरांत आलीं.

मारियाननें हातांतील जाळें खुंटीला लावलें व ती आंत गेली. आणि थोड्या वेळानें एका बशींत कांहीं पदार्थ आणून ते कारोलिनाच्या पुढें ठेवीत म्हणाली :

—हे खाऊन पहा पाहूं. आज आदितवार ना ? तेव्हां आमच्या दुमींगाच्या आवडीचें पक्वान्न केलें आज.

कारोलिनानें खिडकींतून बाहेर वांकून हात धुतले, व बशींतील पक्वान्न खात म्हटलें : " हीं तवशीं तुमच्या मळ्यांतलीं का ? "

—नाहीं ग. तूं त्या दिवशीं आम्हांला तवशें पाठविलें नाहींस का, त्याचेंच केलें हें पक्वान्न. तवशें मात्र सुरेख तुझें. पुष्कळ तवशीं लागलीं का तुझ्या मळ्यांत ?

—तो दुष्ट शेजारी गुस्ताव मिळेल तेथें त्रास देतो ना ? एक ना दोन, पंचवीस वेल लावले होते तवशिणीचे. पण हातातोंडाला आलेले दहाबारा वेल गुस्तावच्या पाड्यानें खाऊन टाकले. त्याचें काय करणार, तूंच सांग ना ?

—खरेंच ! दोन वर्षांपूर्वी आम्ही गांवचे लोक किती सुखी होतों ! गेल्या दहावर्षांत इथें एक देखील चोरी झाली नव्हती. पण तिकडे गेर्र सुरू होऊन गुस्ताव इकडे आल्यापासून गांवांतली शांतता गेली !

—पण किरिस्तांव असून तो असा दुष्ट कसा निपजला ग ? किरिस्तांवांचा एक तरी गुण आहे का त्याच्या अंगांत ?

—जसा बाप तसा त्याचा पोर! तुला आठवण नाहीं वाटतें त्याच्या बापाची ? किती मस्त होता ग तो! जसें कांहीं पाखल्याचें रक्त. निष्कारण लोकांशीं भांडणें उकरून काढावींत, लोकांचे माड पाडावेत, दुकानें लुटावींत. खुन केले नव्हते त्यानें, ते मुलानें केले!

—मौज अशी कीं, गांवांतले पोलिस देखील त्याच्या वाटेला जात नाहींत.

—पोलिस म्हणजे मनुष्यच ना ? त्यांना काय भय नाहीं ? सगळे भित्रे. गुस्ताव जिवावर उदार झालेला. म्हणून सगळें जग त्याला भितें. पोलिसदेखील पुष्कळ वेळां त्याला सामील. मग कोण चवकशी करतें ?

यावेळीं मारियानची तरुण मुलगी तेथें येऊन बसली व तिनें म्हटलें:

—गांवच्या मुलींना गुस्तावनें दिलेले त्रास आठवले म्हणजे अंगावर शहारे येतात ना ग 'मामा' ?

—खरेंच. गेल्या सालच्या एका गोष्टीची मला चांगली आठवण आहे. आमच्या शेजार ची लिंदा माथ्यावर पेज घेऊन शेतांत जात होती. वाटेंत तिला गुस्ताव भेटला. त्यानें तिच्या माथ्यावरची मडकी काढून घेतली. तिला घट्ट पकडलें व बळजबरीनें तिचें चुंबन घेतलें. ती बिचारी बेशुद्ध होऊन पडली! नंतर तिला लोकांनीं सावध करून घरीं आणली.

—मामा, मला वाटतें कीं देव दुष्टांना भितो!

—रोझे, तसें म्हणूं नकोस. देवाची क्षमा माग पाहूं!

—मग गुस्तावचें देव कांहींच वांकडें कां करीत नाहीं ?

—बाळे, गुस्तावचें पारिपत्य करायला देवाला वेळ पाहिजे का ? गुस्ताव सगळ्या न्यायाधीशांना फसवील पण त्याला तो एक घटका देखील फसवूं शकणार नाहीं. समजलीस ? नाहीं ग कारोलिना ?

—त्याच्या पापाचे घडे भरले म्हणजे त्याच्या क्षुल्लक कृत्याच्या निमित्तानें देखील देव त्याचा नाश करील!

—खरच, किती उत्तम बोललास तू! जरा प्रार्थना करू ना आतां?

तिघीहि उठून देव्हाऱ्यापाशीं आल्या. परमेश्वराचें स्तोत्र तोंडानें म्हणत त्यांनीं ख्रिस्ताची प्रार्थना केली! जणूं काय गुस्तावच्या नामोच्चारानें झालेलें पाप त्यांनीं धुवून टाकलें.



सकाळचे दहा वाजले होते. कोळीवाड्यावर घरांच्या अंगणांत ताजी मासळी उन्हांत वाळत टाकली होती. बांबूंच्या दांड्यांवर निरनिराळ्या प्रकारचीं जाळीं टाकलीं होतीं. घरांच्या भिंतोडींत डुकरिणी आपल्या पोरांना घेऊन लोळतांना दिसत होत्या. वाळत टाकलेली मासळी, धन्याची नजर चुकवून चोंचीनें खाण्याची धडपड कोंबडीं करीत होतीं. व मासळीचा उग्र खारट दर्प सगळीकडे पसरून राहिला होता.

—इर्माव,... —गुस्तावची बहीण त्याला म्हणाली.

—आज मासळीला कांहींच नाहीं. शेजाऱ्यांनीं 'रांपण' मारून मासळी आणली आहे. पण ती अगदींच कांट्यांची...

—आज 'शेवटे' मिळाले तर पहातों. या जोरगतीला नदीच्या मुखांत 'शेवटे' चढतात. माझें 'पागेल' शिवलें आहेस ना?—गुस्तावनें विचारलें.

त्याच्या बहिणीनें आंतून पागेल आणून त्याच्या हातीं देत म्हटलें: "आज चांगली मासळी आण तूं, मी सगळी तयारी करून ठेवतें."

केळीच्या 'शेनता'ची मोठी विडी कानाला लावीत गुस्ताव घरांतून बाहेर पडला. त्याच्या कमरेला रुप्याचें भलें मोठें 'कांड' होतें व माथ्याला तांबडा रुमाल बांधला होता.

खांद्यावर पागेल घेऊन किनाऱ्यावरील रेती तुडवीत तो नदीच्या मुखापाशीं आला. किनाऱ्यावर आसपास खडक पसरले होते व कांहीं खडकांच्या मध्यें खोल पाणी सांचलें होतें.

कांठावर राहून त्यानें नदीच्या मुखांतील खोल पाण्यांत मोठ्या कौशल्यानें पागेल सोडलें. पंधरावीस हातांचा घेर धरून तें पाण्यांत

पडलें व त्याचे कां : एकत्र झाले. गुस्तावनें तें वर उचलून त्यांत सांप-डलेली मासळी काढली.

याप्रमाणें मासळी मारीत, फिरत असतांना दगडाच्या एका खबदा-डींत त्याला कांहीं वस्तु दिसली व तो चमकला. पागेल रेतीवर ठेवून तो तेथें गेला व त्यानें आंत पाहिलें तों एक मेलेलें मूल त्याच्या दृष्टीस पडलें.

तो खबदाडींत वांकला व त्यानें तें मूल हातांनीं वर काढलें. तें मूल कोणाचें असेल ? कोणी मारलें असेल ? कां मारलें असेल ? इत्यादि प्रश्न त्याच्या मनांत चटकन् उद्भवले.

किनाऱ्याजवळच्या वाटेनें याचवेळीं दोघे पोलिस शिपाई व एक युरोपियन सार्जंट जात होते. गुस्तावच्या हातांत मेलेलें मूल दृष्टीस पडतांच ते त्याच्याजवळ आले व त्यांनीं विचारलें : " कुणी मारलें हें मूल ?"

गुस्ताव मस्त. सरळ उत्तरें देणें त्याला माहितच नव्हतें. त्यानें बेपर्वा-ईनें म्हटलें : " तें माझ्याकडे काय विचारतां ? मारणाराकडे विचारा."

इतकें म्हणून त्यानें तें मूल खबदाडींत टाकलें. त्याचें मन पूर्ण निर्भय होतें. आपल्यावर बालहत्त्येचा आळ येईल हें देखील त्याला सुचलें नाहीं.

तो सार्जंट त्या गांवांत नवीनच होता. त्यानें अधिकारानें विचारलें : " मग तूं मारलें नाहींस हें मूल ?"

—मी मारलें नाहीं व कुणी मारलें तें मला माहित नाहीं. मला हा प्रश्न करतां ही तुमची मस्ती—गुस्ताव तुच्छतेनें म्हणाला.

—मग तुझ्या हातांत तें मूल कसें आलें ?

—मी मासळी मारीत असतांना मला तें दिसलें. आणखी प्रश्नांचीं उत्तरें मी देणार नाहीं—गुस्तावनें रागानें म्हटलें.

—मग मी म्हणतों कीं, तूंच तें मूल मारलेंस. आम्ही तुला येथून सोडणार नाहीं—गुस्तावच्या जवळ जाऊन सार्जंटनें म्हटलें.

—जाऊं देणार नाहीं म्हणजे काय ? तुमच्यासारखे शेंकडों सार्जंट

मी पाहिले आहेत. मला ओळखत नाहीं तुम्ही —प्रतिकार करण्याच्या तयारीनें गुस्ताव म्हणाला.

सार्जंट चिडला. मूल मारलें असूनहि, हा एवढ्या गुर्मीनें वागतो हें त्याला खपलें नाहीं. त्यानें शिपायांना म्हटलें :

— याला सोडतां उपयोगी नाहीं. पकडा याला.

व त्यानें गुस्तावचा दंड जोरानें पकडला.

गुस्ताव भारी सशक्त. त्यानें आपला दंड सोडवून घेतला व सार्जंटला जोरानें दूर ढकलून दिलें. हें पहातांच दोन्ही शिपायांनीं त्याचे हात पकडले. इतक्यांत सार्जंट पडतांना सांवरून उभा राहिला व कंबरेची बायोनेट काढून ती गुस्तावच्या पोटाला लावीत त्यानें म्हटलें :

— जास्त मस्ती करशील तर ही बायोनेट पोटांत खुपशीन.

गुस्तावनें जास्त धडपड केली नाहीं. सार्जंटनें तें मूल हातांत घेतलें व गुस्तावच्या दोन्ही दंडांना धरून शिपाई चालूं लागले.



मूल मारल्याचा आरोप ठेवून गुस्तावvर सरकारतर्फे खटला भरण्यांत आला. मुलाची तपासणी करण्यांत आली. डॉक्टरनें सांगितलें कीं, मूल जन्मास येऊन चोवीस तास लोटले असून, गळा दाबून त्याचा प्राण घेतला आहे.

खुद्द पोलीसच साक्षीदार. त्यांनीं सगळी हकीगत सांगितली व गुस्ता-वच्या पूर्वीच्या वाईट वर्तनासंबंधीं साक्षीपुरावा गोळा करून तो कोर्टांत सादर केला.

पोलिसांनीं तयार केलेल्या साक्षीपुराव्यावरून कोर्टाची अशी खात्री झाली कीं, एखाद्या कुमारिकेशीं गुस्तावचा वाईट संबंध असावा, त्या संबंधापासून तिला मूल झालें असावें व तें मूल गुस्तावनें मारून समु-द्रांत टाकलें असावें.

जज्ज मोठा न्यायी पण कडक होता. त्यानें निकाल देतांना म्हटलें : ''आरोपी गुस्ताव याच्यावर भ्रूण-हत्त्येचा आरोप आहे. मूल मारून समुद्रांत टाकतांना पोलिसांनीं प्रत्यक्ष पाहिलें असल्यामुळें, त्यासंबंधीं

कांहींच शंका राहिलेली नाहीं. गुस्तावच्या मागील वर्तनासंबंधीं जो पुरावा दाखल झालेला आहे, त्यावरून त्यानें बरेच गुन्हे केले असावेत, असें दिसतें. सगळ्या गांवाला त्याचें अस्तित्व असह्य झालें आहे, असें विरुद्ध साक्षिदारांच्या साक्षीवरून कळतें. त्यानें यापूर्वी पुष्कळांना निष्कारण त्रास दिले आहेत. पण एकदांहि तो पोलिसांना सांपडला नाहीं, याचें आश्चर्य वाटतें. मुलाला त्यानें आधींच मारून तेथें नेऊन टाकण्याकरितां तो समुद्रावर गेला होता. एवढ्या दिवसा त्यानें हें काम केलें नसतें, असें आरोपीतर्फेच्या वकिलाचें म्हणणें आहे. पण आरोपीची निर्भयवृत्ति लक्षांत घेतां त्यानें मेलेलें मूल दिवसा नेऊन टाकण्याकरितां समुद्रावर यावें हें साहजिक आहे. हें सगळें लक्षांत घेऊन, मी आरोपीला दहा वर्षांच्या हद्दपारीची शिक्षा देत आहें. "

हा अनपेक्षित निकाल ऐकून गुस्तावच्या हृदयांत विलक्षण खळबळ उडाली. स्वतः अपराधी नसतां एवढी शिक्षा आपणास कां भोगावी लागत आहे, हा प्रश्न त्याच्या मनांत उद्भवला. पण मागचीं शेंकडो दुष्कृत्यें डोळ्यांपुढें येतांच त्याचें हृदय द्रवलें. त्याला एकदम पश्चात्ताप झाला. त्याच्या वृत्तींत भयंकर पालट झाला. त्याचें हृदय भरून आलें. डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. तो उठून उभा राहिला व त्यानें न्यायाधीशांकडे पाहून म्हटलें:

—आपण सांगितलेली शिक्षा मी भोगणारच. मला सांगावयाचें आहे तें एवढेंच कीं, मी आतांपर्यंत दोनचार खून केले, आठदहा दरोडे घातले, कांहीं स्त्रियांवर बलात्कार केले. हें मूल मात्र मी मारलें नाहीं. पण एकाहि न्यायाधिशाला माझा न्याय करतां आला नाहीं. परंतु या बालकाच्या निमित्तानें मला त्या सर्वश्रेष्ठ न्यायाधीशानें ही शिक्षा दिली आहे.

आणि आपला चेहरा वर करून व आकाशाकडे हस्तक्षेप करून त्यानें सद्गदित कंठानें म्हटलें: " तूं जुवीज नव्हे. खरा जुवीज तो !"

५–१–३२

**कल्पवृक्षांच्या छायेंत**
प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई

# लाव्हा

सह्याद्रीची सांवली व समुद्राचें अंगाईगीत यांनीं सुखावलेला गोमन्तक सुंदर खराच. परंतु त्यांतल्या त्यांत बोरीगांव अत्यंत सुंदर. नारळी-पोफळीच्या वैभवसंपन्न बागा हें गोमन्तकाचें एक आकर्षक वैशिष्ट्य. स्वच्छ पाण्याचे निर्झर वर्षाचे बाराहि महिने नारळींच्या गायनाला साथ करितात. ग्रीष्म ऋतूंतदेखील गवताचे हिरवेगार गालिचे चोहोंकडे अंथरलेले. जणुं काय निसर्गदेवीच त्यांच्यावर नृत्य करीत आहे. पण हें सगळें सौंदर्य बोरी गांवांत फारच प्रकर्षानें एकत्र पहावयास सांपडतें; आणि म्हणूनच आज मी तिकडे चाललों होतों.

लिस्बोआला लवकरच एक चित्रांचें भव्य प्रदर्शन उघडावयाचें असून त्यांत सर्वोत्कृष्ट ठरणाऱ्या चित्राला तेथील एका धनीक फिदाल्गानें दहा हजार रुपयांचें बक्षीस ठेवलें होतें. या प्रदर्शनांत माझी एखादी कलाकृति पाठवून पहावी, हा विचार कांहीं दिवसांपासून माझ्या मनांत घोळत

होता. दहा हजार रुपये मिळाले तर जर्मनीला जाऊन चित्रकलेचें आणखी शिक्षण घेतां येण्यासारखें होतें. बॉंबे आर्ट स्कूलची मला पदवी होती व निरनिराळ्या प्रदर्शनांतून माझ्या चित्रांना प्रशंसापत्रें मिळालीं होतीं. तरी पण माझी सांपत्तिक स्थिति फारशी समाधानकारक नव्हती. गोमन्तकांत माझ्या कलेला प्रोत्साहन मिळत होतें, पण तें सक्रीय नव्हतें. त्यामुळें लिस्बोआंत उघडणाऱ्या प्रदर्शनांत पाठविण्याच्या योग्यतेचें एखादें वैशिष्टयपूर्ण चित्र काढावें या हेतूनें मी या निसर्गसुंदर गांवांत पाऊल ठेवीत होतों.

मोटारींतून उतरून गांवाकडे जाणाऱ्या वाटेनें मी सावकाश चाललों होतों. वाट एका उंच बांधावरून गेली असून बांधाच्या दोन्ही कडांनीं नारळीचीं उंच सरळ झाडें ठराविक अंतरानें उभीं होतीं. बांधाच्या दोन्ही बाजूंस दोन अरुंद पण लांब हिरवींचार शेतें पसरलेलीं. प्रत्येक शेताच्या पलीकडे एक पोफळीचें दाट कुळागार. प्रत्येक कुळागाराच्या मागें एकेक उंच डोंगर. उजव्या बाजूच्या डोंगराचें नांव सिद्धनाथ. जणुं-काय एखादा साधूच तप करीत बसला आहे, इतका गंभीर आणि प्रशान्त. रस्त्याच्या मागच्या बाजूस वाऱ्याच्या झुळकीमुळें समुद्राच्या लाटांप्रमाणें वर खालीं होणारीं विस्तीर्ण हिरवीं शेतें, व त्यांच्या दूरच्या सीमेवर सर्पाप्रमाणें वांकडीं तिकडीं वळणें घेऊन अदृश्य होणारी 'जुवारी' नदी. तेथील प्रत्येक गोष्टींत रेंखीवपणा व भव्यता दिसून येई.

बांधाखालून वहाणाऱ्या एका ओढ्याच्याजवळ मी पोंचलों होतों. ओढ्याच्या वरच्या बाजूस कांहीं ख्रिश्चन परिटिणी कपडे धूत होत्या, व मधून मधून आळीपाळीनें कोंकणी गाणीं म्हणत होत्या. घुंगुरवाळ्या-प्रमाणें रुमझुमणाऱ्या निर्झरांचा मधुर ध्वनि, कुळागाराच्या झाडांतून वाऱ्यांमुळें निघणारा 'सूं...' असा आवाज व त्या झाडांतून निर-निराळ्या पक्ष्यांची निघणारी किलबिल या सर्वांच्या मिलाफानें उत्पन्न होणारें निसर्गाचें गाणें त्या वातावरणांत अविच्छिन्नपणें चालू असे. नुकताच पाऊस पडून गेल्यामुळें सगळी सृष्टि धुतल्यासारखी स्वच्छ व

प्रफुल्ल दिसत होती. सायंकाळचें कोंवळें ऊन पडल्यामुळें सगळीकडे आनंद दिसत होता. सभोंवतालची एकतानता पहातांच मला वाटलें, माझ्या चित्राला या सारखी पार्श्वभूमि दुसरी कुठेंच मिळाली नसती! इतर स्थलीं सौंदर्य मिळेल; पण उदात्तता, भव्यता तेथें दिसून येणार नाहींत. त्या जागीं पोंचतांच कोणत्याहि मनुष्याच्या भावना उच्च झाल्या पाहिजेत. जगांतील दुःखांचा, दुबळेपणाचा, हीन विचारांचा त्याला क्षणभर तरी विसर पडून सृष्टीच्या सर्वव्यापी शक्तीशीं त्याचें लवकर तादात्म्य घडून आलें पाहिजे असें मला स्वानुभवानें दिसून आलें.

निसर्गाच्या उदात्ततेनें युक्त अशी पार्श्वभूमिका न शोधतां मिळाली. पण विषय कोणता घ्यावयाचा, कुणाचें चित्र रंगावयाचें हा विचार मनांत आला. एकदां वाटलें, इतक्या उदात्त व सुंदर निसर्गाच्या सान्निध्यांत असणारीं माणसें उदात्त असलीं पाहिजेत, भावपूर्ण मुद्रेचीं असलीं पाहिजेत. जसा निसर्ग तशीं मनुष्यें. या निसर्गाचें चित्र काढावयाचें तर तें त्याच्या बालकांना वगळून काढल्यास शोभणार नाहीं. आईच्या मांडीवर बसून तिच्या पदरांत तोंड लपविणाऱ्या व तिच्याभोंवतीं रांगणाऱ्या बालकाशिवाय आईचें चित्र काढणें सहृदयतेचें आणि उचित होईल काय? पण असलें बालक मला तेथें, गालिच्यांवर वागडणारें, निर्झरांशीं खेळणारें, वाऱ्याशीं गुजगोष्टी करणारें कोण मिळेल? रस्त्यावरून हळुहळू चालतांना हा विचार माझ्या मनांत येतो न येतो तोंच, उजव्या हाताकडच्या शेतांत पांचसहा कामकरी बायांच्या मध्यें बसून हिरवळ उपटीत असलेली एक तरुणी माझ्या दृष्टीस पडली. व त्याबरोबर मी वाटेवरच थबकलों!

शेताच्या एका कुणग्यांत बसून ती उजव्या हातानें हिरवळ उपटून काढीत होती. ख्रिश्चन पद्धतीचा, पातळ कापडाचा तिनें घातलेला आंखूड झगा तिच्या गुडघ्यापर्यंत पोंचला होता व त्याखालचे पाय अगदीं उघडे होते. सभोंवतालच्या निसर्गाप्रमाणें तिच्या कोवळ्या मोहक चेहऱ्यावर उदात्त, पवित्र पण अकृत्रिम नाजुक भाव खेळत होते. तिचा रंग गोरा नव्हता, पण तिचा सांवळेपणाच इतका तजेलदार व

मनोहर छटांनीं युक्त दिसत होता कीं, कोणत्याहि जातिवंत चित्रकारास असला रंग चित्रावर उठविण्यास मिळाला ह्याबद्दल आनंदच झाला असता. तिचे डोळे निर्झराच्या पाण्याप्रमाणें स्वच्छ, निष्कलंक असून त्यांत अशी कांहीं जादू होती कीं ते पहाणाराच्या मनांत उदात्त भावना उदित व्हाव्या, हीन विकार नष्ट व्हावे व त्याला असें वाटावें कीं, असले पावन नेत्र, दुरूनच कां होईना, आपल्या दृष्टीस पडण्याचें भाग्य आपणांस लाभावें, म्हणजे सत्कृत्यें करण्याची स्फूर्ति आपणास त्यांच्या-पासून मिळेल. वन्य, दैविक सौंदर्य व निसर्गरम्य, नाजुक, अकृत्रिम भाव यांचें दर्शन मला घडलें. माझें हृदय आनंदानें उचंबळून येऊन मी मनांत म्हटलें: 'जसा निसर्ग तसें त्याचें बालक !'

पण ती गरीब होती. कारण पावसाळ्याच्या थंडींत एक पातळ झगा घालून उघड्या पायांनीं शेतांत काम करण्यास येणारी ती तरुणी कितीशी श्रीमंत असणार ? परमेश्वराच्या कठोरपणाबद्दल प्रथम मला वाईट वाटलें. इतकें शुद्ध, सात्त्विक सौंदर्य गरीबींत पडावें ही कल्पना मला असह्य वाटली. पण लगेच मनांत असा विचार आला कीं, तिला गरीब करून देवानें योग्य तेंच केलें. आकाशांतील तारका देवानें उघड्या-वरच टाकल्या नाहींत काय ? इतरांना सुख देणें हेंच सुंदर वस्तूंचें कार्य ! फुलाचें कार्य रसिकांना आनंद देणें हेंच नाहीं काय ? गुलाब फुलतो आणि दरवळतो तो इतरांना आनंद देण्याकरितां, झांकून रहाण्याकरितां नव्हे. श्रीमंतीमुळें सौंदर्य झांकून रहातें, कृत्रिम बनतें; त्याचें खरें कार्य घडून येत नाहीं. हीच तरुणी श्रीमंत असती तर तिचें सर्वांग मखमालीनें लपेटून राहिलें असतें. तिचे सुंदर, नाजुक पाय बुटांत झांकून राहिले असते. लोकांच्या मनांत पवित्र भाव जागृत करणारा तिचा उद्धारक चेहरा दूषित झाला असता. उलट गरीबीमुळें तिनें वापरलेलें पातळ, अपुरें वस्त्र तिच्या देहाचें खरें सौंदर्य आविष्कृत करतें.

माझ्या मनांत वरील विचार आला व निसर्गाच्या बागेंत वाढलेलें हें सुवासिक फूल रेखाटण्यास मला मिळेल तर किती बरें होईल असें मला वाटलें. पण हें कसें शक्य आहे ? तैलचित्र रेखाटणें म्हणजे

ती एका घटकेची गोष्ट नव्हे. विशिष्ट स्थळी, विशिष्ट तऱ्हेनें त्या तरुणीनें बसलें पाहिजे व कांहीं दिवस माझ्याप्रमाणें तिनेंहि खर्च केले पाहिजेत. हें कसें शक्य आहे? ती कोण असेल कुणाला ठाऊक? आणि ती कोण आहे याचा तपास काढला तरी ती आदर्श नमुना म्हणून माझ्यापुढें तासचे तास ती बसूं शकेल काय? काय होईल? ... पण हें निसर्गाचें अप्रतिम चित्र काढावयाला मला मिळेल तरच मी प्रदर्शनांत यशस्वी होण्याची आशा!

भारावलेल्या मनःस्थितींतच मी रस्त्यानें हळुहळू चालूं लागलों. तो सुंदर, उदात्त देखावा दृष्टिआड होईपर्यंत मी कितीदां तरी मागें वळून पाहिलें. कांहीं वेळानें मी माझा मित्र तोमाश याच्या घराकडे पोंचलों. तोमाश घरापुढील बागेंत कांहीं काम करीत होता. मी त्याच्याकडे उतरणार हें त्याला पूर्वी पत्र पाठवून मी कळविलें होतें. बागेंतलें काम थांबवून तोमाशनें माझें स्वागत केलें व आम्ही घरांत शिरलों. त्यानें मला निरनिराळ्या गोष्टींवर प्रश्न विचारले. परंतु माझी मनःस्थिति बरोबर नसल्यामुळें मी त्याच्या प्रश्नांना त्रोटकच उत्तरें दिलीं व संधि साधून वाटेंत घडलेला प्रकार सांगितला आणि ती तरुणी कोण असेल तें त्याला मोठ्या उत्सुकतेनें विचारलें.

तोमाश हंसून म्हणाला:

—तिचें नांव लाव्रा. तिला आम्ही बोरीची वनदेवता म्हणतों. येथले उनाड तरुण देखील तिच्याशीं आदरानें व सभ्यतेनें वागतात. तिच्या दर्शनानें दुःखी मनुष्याचें अर्धें दुःख कमी होतें. पण बिचारीचा बाप गरीब!

—तें मला दिसलेंच होतें. पण तोमाश, तिच्यावरून चित्र काढण्याची कल्पना तुला कशी दिसते?—मी तोमाशला उत्कंठेनें विचारलें.

—उत्तम. शिवाय तिला शेतांत बसवून पाहिजे असलेलें चित्र काढण्याला तुला फारशी अडचण येणार नाहीं असें वाटतें. कारण मानापमानाच्या, उच्चनीचत्वाच्या हीन भावनांचा तिच्या मनाला अजून स्पर्श झालेला नाहीं. ती अविवाहित आहे हें खरें, पण आपल्या

देहाचें चित्र तुझ्याकडून काढवून घेण्यांत तिला मुळींच लाज वाटणार नाहीं. उलट, आपला एवढा उपयोग होण्यासारखा आहे हें कळतांच तिला मुलाप्रमाणें आनंद होईल. स्वतः आनंदी राहून इतरांना आनंद द्यावा हेंच तिचें कार्य.

तोमाशचें भाषण ऐकून मला किती तरी बरें वाटलें. अगदीं अशक्य वाटणारी गोष्ट शक्य झालेली दिसतांच लाव्राला गरीब केल्याबद्दल परमेश्वराचे मी आणखी एकदां आभार मानले व तोमाशला म्हटलें :

—पण तिचा बाप तिला परवानगी देईल असें तुला वाटतें ?

—हो तर ! न द्यायला काय झालें ? मुलीप्रमाणेंच बापहि सज्जन. तिच्यावर त्याचा पूर्ण विश्वास. शिवाय चित्रकार त्याला फार आवडतात.

—तें कां बुवा ? तो स्वतः चित्रेंहि काढतो कीं काय ? —मी किंचित् आश्चर्यानेंच तोमाशला विचारलें.

—तसें नाहीं; पण त्याचा एक मुलगा चित्रकार होऊन गेला. चित्रकलेचें शिक्षण असें त्याला कांहींच नव्हतें. पण चित्रें मात्र बऱ्यापैकीं काढी. बिचारा दोन वर्षांपूर्वी वारला. तेव्हांपासून त्याचा बाप त्यानें काढलेल्या चित्रांकडे पाहून अश्रु ढाळीत बसतो.

थोडा वेळ थांबून तोमाश पुन्हां म्हणाला :

—पण हें बघ, फेर्नान्दु, चित्राला बक्षीस मिळून तूं सुखी झालास म्हणजे त्या बिचारीला मात्र विसरूं नकोस ! —या शेवटच्या उद्गारां-तील खरा अर्थ माझ्या लक्षांत आल्याशिवाय राहिला नाहीं.

मी म्हटलें :

—या पुढच्या गोष्टी. सगळ्या पोर्तुगेज साम्राज्यांतील शेंकडों चित्रकार आपलीं उत्तमोत्तम चित्रें प्रदर्शनांत पाठविणार. मग मला बक्षीस मिळेल ही आशा व्यर्थच नाहीं काय ? बाकी बक्षीस मिळालें किंवा न मिळालें तरी लाव्रेचे उपकार मी कधींहि विसरणार नाहीं..

रात्रीच्या आठ वाजल्यानंतर आम्ही लाव्रेच्या घराकडे जाण्या-करितां निघालों.

मला बरोबर घेऊन तोमाश लाव्रेच्या घराकडे गेला. लाव्रा व तिचा

ाप हीं त्याच्या पूर्ण ओळखीचीं. यामुळें तो परवानगीकरितां तिष्ठत ा बसतां थेट घरांत शिरला. घर लहानच, परंतु टुमदार व गोमन्तकांील बहुतेक ख्रिश्चन शेतकऱ्यांच्या घरांप्रमाणें व्यवस्थित होतें. ज्या ओलींत आम्ही प्रवेश केला तेथें पांचसहा खुर्च्या, एक वाटोळें लहान ेज, भिंतीला ख्रिस्त व मेरी यांच्या तीनचार रंगीत तसबिरी व दोनतीन वॉटरकलरचीं निसर्गालेख्यें होतीं. एका कोंपऱ्यांत लहानसा लांकडी देव्हारा असून त्यांत रुप्याचा क्रॉस व ख्रिस्ताचें एक चित्र होतें. देव्हाऱ्यांत दिवा जळत होता. मोगऱ्यांच्या फुलांची एक माळ व दोन गुलाबाचीं फुलें क्रॉसच्या शेजारीं ठेवलीं होतीं.

मला एका खुर्चीवर बसावयास सांगून तोमाश आंत गेला व थोड्याच वेळानें लाॅरेच्या बापाबरोबर बाहेर आला. म्हाताऱ्यानें माझें अंतःकरणपूर्वक स्वागत केलें. माझ्यासारखा फिदाल्ग आपल्या घरांत आला याबद्दल त्याला फार समाधान वाटलें. माझी ओळख करून देतांना तोमाश म्हणाला:

— यांचें नांव फेर्नान्दु द कोस्त. हे एक गोमन्तकांतील प्रख्यात चित्रकार आहेत.

हे शब्द ऐकतांच म्हाताऱ्याच्या आनंदी, मोकळ्या मुद्रेवर उदासीनतेची छाया पसरली. थोडा वेळ तो स्तब्ध राहिला. कोणत्या तरी पूर्वस्मृति त्याच्या हृदयाला यातना देत आहेत असे त्याच्या चेहऱ्यावरून दिसून आलें. सकंप आवाजांत त्यानें म्हटलें:

— सिन्योर कोस्त, मला या स्थितींत पाहून तुम्हांला आश्चर्य वाटलें असेल. पण तुम्ही चित्रकार आहां हें कळतांच मला माझ्या दुर्दैवी मुलाची आठवण झाली. तुमच्यासारखा तोहि चित्रकार होता. त्यानें काढलेलीं कांहीं चित्रें मी जिवाप्रमाणें जपून ठेवलेलीं आहेत. त्याला शिक्षण असें नव्हतेंच; पण चित्रकलेची उपजत आवड फार. यामुळें पोटाकरितां शेतांत काम करतांना देखील त्याचें लक्ष सभोंवतालच्या सौंदर्यावर लागलेलें असायचें. तुम्ही इथें येऊन फार बरें केलें. आमच्या गांवासारखा सुंदर गांव चित्रकाराला दुसरीकडे सांपडणार नाहीं.

आपण इथें आलांच आहांत तर येथील एखाद्या सुंदर देखाव्याचें चित्र काढल्याशिवाय जाऊं नका.

—चित्र काढण्याच्या उद्देशानेंच ते आज तुमच्याकडे आले आहेत. त्यांची इच्छा पुरी करणें तुमच्या हातांत आहे, ज्युआंवबाब.

ज्युआंवबाव गोंधळांत पडला. तोमाशच्या बोलण्यांतील खरा अर्थ न समजल्यामुळें तो म्हणाला :

—म्हणजे ! आमचें चित्र काढण्याकरितां यांना इथें आणलें आहेस कीं काय ?

—तसेंच म्हणा ना घटकाभर. आपलें नाहीं तर आपल्या लाव्रेचें ! —तोमाश म्हणाला.

म्हाताऱ्याला आनंद झालासें दिसलें. तोमाशनें त्याला माझें मनोगत सांगितलें. म्हातारा किंचित् हंसला. नंतर त्यानें हांक मारली :

—लाव्रा ! लाव्रा !

हंसतमुखानें लाव्रा बाहेर आली. मला पहातांच ती लाजली नाहीं किंवा भ्याली नाहीं. ज्युआंवच्या खुर्चीला टेकून उभी राहून तिनें म्हटलें :

—पापा ... !

त्या गरीब साध्या खोलीला तिच्या आगमनानें विलक्षण शोभा आली. तेथील प्रत्येक वस्तूंत चैतन्य शिरत आहे असें मला वाटलें. कां कुणास ठाऊक, माझे हृदय एक प्रकारच्या उच्च आनंदानें भरून आलें.

म्हाताऱ्यानें माझ्याकडे हस्तक्षेप करून म्हटलें :

—यांचें नांव फेर्नान्दु. हे एक मोठे चित्रकार आहेत. आमच्या गांवचें एखादें सुंदर चित्र काढून तें लिस्बोआच्या प्रदर्शनांत पाठविण्याची ह्यांची इच्छा. स्थल यांनी निवडून काढलेलें आहे. पण तूं असल्याशिवाय त्यांचें चित्र पूर्ण होणार नाहीं. म्हणून त्यांचें मागणें व माझें तुला सांगणें असें कीं ते सांगतील त्या शेतांत बसून तूं त्यांना चित्र काढण्याला मदत कर.

माझ्याकडे पाहून लाव्रेनें सौम्य स्मित केलें. आपणाला एवढा मोठेपणा मिळत आहे हें पाहून तिला फार आनंद झाला. माझ्याबद्दल

तिच्या मनांत कोणताच हीन, हलका विचार आला नाहींसें दिसलें. आपल्या साध्या भावपूर्ण डोळ्यांनीं माझ्याकडे पहात तिनें म्हटलें:

— काय करावें लागेल मला ?

— आजच्याप्रमाणें शेतांत बसून हिरवळ उपटून काढायची !

मी अगदी साधेपणानें व आपलेपणानें उत्तर केलें. एका मिनिटाचें भाषण. पण मला असें वाटलें की, हिच्या सुखाकरितां झटणें हें माझें कर्तव्य.

दुसऱ्या दिवशीं मी लाव्रेला बरोबर घेऊन त्या शेतांत आलों. लाव्रा माझ्या सूचनेवरून मुद्दाम साध्या पातळ कापडाचा एक आंखूड लहंगा नेसली होती. पायांत कांहींच नसल्यामुळें तिचे चिमुकले नाजुक पाय उघडेच होते नुकतेंच उन्नत होत जाणारें तिचें वक्षस्थळ विरळ ढगांच्या आड असणाऱ्या चंद्राप्रमाणें दिसत होतें. हात सगळे उघडे होते. केंसांच्या सैल अंबाड्याखालीं सगळी मान लपली होती. आपलें सौंदर्य जास्त आकर्षक दिसावें म्हणून तिनें कोणताच कृत्रिम उपाय केला नव्हता. तरी पण, मोगऱ्याचें फूल जसें सहजसुंदर व साधें, तसेंच लाव्रेचें लावण्य सहजरम्य आणि आकर्षक होतें.

वाटेंत आम्ही मोकळेपणानें बोलत होतों. बोलतां बोलतां लाव्रा मला म्हणाली:

— आपण चित्रं कां काढतां ?

प्रश्न लहानच, पण त्याला काय उत्तर द्यायचें तें चटकन् मला सुचेना. कांहींतरी उत्तर द्यावें म्हणून तिला समजण्यासारख्या भाषेंत म्हणालों:

— सौंदर्य हें स्फूर्तिदायक असतें. हीन भावना मारून त्या जागीं उच्च सात्त्विक भावना पेरण्याचें कार्य सौंदर्य करूं शकतें. असलें सौंदर्य चिरंतन करणें हें चित्रकलेचें काम.

— मग माझ्या सौंदर्यानें इतरांच्या उच्च भावना जागृत होतील असे तुम्हांला वाटतें ?

— अवश्य. इतरांची गोष्ट बाजूस ठेवूं. आपल्या दर्शनानें माझ्या स्वभावांत केवढी क्रांति घडून आलेली आहे म्हणून सांगूं! इतकी स्फूर्ति

मला यापूर्वी कोणत्याच वस्तूच्या दर्शनानें झालेली नाहीं. असल्या सौंदर्य-दर्शनाचा लाभ चित्र रूपानें जगाला देणें हें माझें कर्तव्य नाहीं काय ?

सायंकाळचे चार वाजले होते. आज पाऊस नसल्यामुळें सर्वत्र ऊन पडलें होतें. शेताच्या दुसऱ्या बाजूस असलेल्या कुळागारांत योग्य अशा ठिकाणीं कपडा, रंग, कुंचले वगैरे सामान ठेवून मी शेतांत उतरलों. लाव्रा कालच्या जागीं येऊन बसली व हातानें हिरवळ तोडण्याचा फार्स करूं लागली. मी तिच्याजवळ जाऊन कोणत्या दिशेकडे तोंड करून बसायचें हें तिला दाखवूं लागलों. या कामांत मी इतका तद्रूप होऊन गेलों होतों कीं, मी नकळत, शेतांत बसलेल्या लाव्रेचा हात माझ्या हातानें योग्य त्या ठिकाणीं ठेऊन म्हटलें:

—हा हात असा धरायचा.

पण लगेच मी भानावर आलों व माझ्या शरीरावर रोमांच उभे राहिले. लाव्रेचा अपमान झाला नाहीं ना, तिच्या सौजन्याचा मी दुरुपयोग करीत नाहीं ना, असे वाटून मी ओशाळल्यासारखा झालों व तिचें समाधान करण्याकरितां तिला म्हणालों:

—आपला अपमान झाला असल्यास मला क्षमा करा.

अगदीं मोकळेपणानें माझ्याशीं बोलणारी लाव्रा माझ्या वरील शब्दांनीं लज्जित झाली. माझ्याबद्दल तिच्या मनांत कोणते नवीन भाव जागृत झाले तें मला सांगतां येत नाहीं. पण ती दचकली, भ्याली. खालीं मान घालून तिनें मला म्हटलें:

—यांत माझा अपमान झाला असें तुम्हांला वाटलें ?

—तुमचें मन मोठें म्हणून तुम्ही असें म्हणतां—मी खजील होऊन म्हटलें.

सतत पांचसात दिवस काम करून मी अपेक्षित चित्र तयार केलें. पण माझा हस्तस्पर्श झाल्यापासून तिच्या वागणुकींत केवढी तरी क्रान्ति घडून आलेली मला दिसली. तिच्या प्रत्येक हालचालींत एक प्रकारचा मोहक मुग्धपणा दिसूं लागला. तिचें बालजीवित संपून, गंभीर अशा निराळ्याच आयुष्याला सुरुवात झाली असें मला वाटलें.

तें चित्र रंगवितांना मला एक प्रकारचा अननुभूत, उच्च आनंद उपभोगण्यास मिळत होता.

लाव्रेनें कोणत्याच स्वार्थावर नजर न ठेवतां मला केवढें सहाय्य केलें होतें! तिच्या देहाचें, देहाच्या प्रत्येक भागाचें मी निरीक्षण केलें होतें. हें मनांत आणून मला असें वाटे कीं, तिनें केलेल्या उपकारांचा मी काय मोबदला देणार?

बरोबर तीन महिन्यांनीं लिस्बोआच्या प्रदर्शनाचा निकाल लागून बक्षीस माझ्या चित्राला मिळाल्याचें जाहीर झालें. पोर्तुगीज साम्राज्यांतील एक अलौकिक चित्रकार म्हणून माझा जिकडे तिकडे फारच गौरव झाला. पोर्तुगालच्या कांहीं रसिक धनिकांनीं कांहीं विशिष्ट चित्रें काढून पाठविण्याची मला पत्रद्वारें विनंति केली. बक्षिसाची दहा हजार रुपयांची रक्कम माझ्या हातीं आली होती. काल जवळजवळ भिकारी असलेला मनुष्य आज श्रीमंत व कीर्तिमान् बनला होता. अशावेळीं मला बोरीगांवची आठवण होणें अगदीं स्वाभाविक होतें. माझ्या स्फूर्तीला चालना देऊन माझ्या भाग्याला कारणीभूत होणाऱ्या लाव्रेच्या उपकारांतून मी कसा उतराई होणार ही मला चिंता पडली. क्षणभर मनांत असा विचार आला कीं, तिचें पाणिग्रहण करणें हाच तिच्या उपकारांतून उतराई होण्याचा मार्ग. जिच्या प्रसादामुळें माझ्या वैभवसंपन्न नव्या आयुष्याला सुरुवात झाली, त्या लाव्रेला माझें पुढचें आयुष्य अर्पण करणें हेंच माझें कर्तव्य. ती गरीब आहे. तिचा बाप देखील म्हातारा झालेला. पण इतकेंहि असून मोबदल्याची कोणतीच अपेक्षा न करितां तिनें मला आपलें चित्र काढावयास दिलें. आपल्या देहाचें निरीक्षण करावयास दिलें, जें निरीक्षण केवळ तिच्या पतीनें करणें जगाच्या दृष्टीनें योग्य झालें असतें. पण मी तिचा स्वीकार केला तर इटालीला जाऊन तेथील, चित्रकलेचें सर्वांगीण शिक्षण घेण्याचा जो माझा विचार आहे त्याची वाट काय? कर्तव्याकरितां ध्येय सोडावयाचें काय? पण दुसऱ्या कोणत्या रीतीनें लाव्रेचे उपकार फेडावयाचे!

लाव्रेला द्रव्य रूपानें भरपूर मोबदला देण्याचा निश्चय करून मी बोरीला परत आलों. येतांना त्या सुंदर देखाव्याचें दर्शन घेण्याकरितां वाटेंत मी बराच वेळपर्यंत उभा राहिलों. लाव्रेची पवित्र, पावन मूर्ति कल्पनाचक्षूंनीं माझ्या नजरेपुढं स्थिर करीत मी गत आनंदाचा उपभोग घेतला. तोमाशच्या घराकडे पोंहचतांच मी त्याला पहिला प्रश्न केला तोहि लाव्रेसंबंधीं! पण त्यानें सांगितलेली हकीगत ऐकून माझें मन अस्वस्थ झालें. तो म्हणाला:

—पंधरा दिवसांपूर्वीं तिचा बाप तापाचें निमित्त होऊन वारला. बिचारीचा एकटा एक आधार तुटला. सध्यां ती घरींच असते.

मी तात्काळ उठून तिच्या घराकडे निघालों.

लाव्रा खुर्चीवर बसून कांहीं विणीत होती. मला पहातांच ती चमकून उठली. माझ्याकडे तिनें ज्या नजरेनें पाहिलें तिचें वर्णन करणें अशक्य. हजारों शब्दांनीं जें कुणाला सांगतां आलें नसतें तें तिच्या डोळ्यांत मला दिसून आलें. मी तिच्याजवळ जाऊन म्हटलें: "लाव्रा!"

तिनें आपली नजर खालीं जमिनीकडे लावली.

—ज्युआंवबाबा वारले हें कळून मला फार वाईट वाटलें—मी म्हटलें—तुमचें आतां कसें होईल?

फुलावर चमकणाऱ्या दंवबिंदुप्रमाणें तिच्या डोळ्यांत दोन अश्रु चमकले. तिची मुद्रा जास्तच उदासीन झाली. मी खुर्चीवर बसलों व तिला खुर्चीवर बसण्यास सांगितलें. पण ती बसेना. तीन महिन्या पूर्वीं माझ्याशीं सलगीनें, आपलेपणानें वागणारी लाव्रा आज मुकी मंद बनली होती.

थोड्या वेळानें मी तिला म्हटलें:

—तुझ्या चित्राला लिस्बोआच्या प्रदर्शनांत पहिलें बक्षीस मिळालें!—हें ऐकतांच तिची मुद्रा पालटली. तिला फार आनंद झाला मान वर करून माझ्याकडे पाहून तिनें म्हटलें:

—आज तीन महिने दररोज, तुम्हांला प्रदर्शनांत यश मिळावें म्हणून मी मेरीची प्रार्थना करीत असें. तुम्ही यशस्वी झालां हें माझें सुदैव!

शेवटीं तिच्या हृदयाचा मला ठाव लागला. पैशांच्या रुपानें तिला मोबदला देण्याचा माझा विचार मावळला. तिच्या व्यक्तींत माझें व्यक्तित्व विलीन होत आहे असें मला दिसून आलें.

मी सकंप आवाजांत म्हटलें: " लाव्रा ! "

लाव्रानें आपली उद्धारक नजर माझ्या चेहऱ्यावर स्थिर केली.

—ज्या देवतेच्या प्रसादानें माझ्या आयुष्याचें फुल उमललें व त्याचा गंध सर्वत्र दरवळला, त्या देवतेला माझें हृदय वाहिल्यास त्याचा स्वीकार होईल काय ?—मी माझा हात पुढें करीत म्हटलें.

माझा हात प्रेमभरानें हातांत धरून लाव्रेनें जमिनीला गुडघे टेंकले व डोळे आकाशाकडे लाविले.

मोहिनीनें भारल्याप्रमाणें मीहि तिचेंच अनुकरण केलें.

दारांतून तोमाशचे उद्गार ऐकूं आले: " परमेश्वर तुम्हांला सुखी ठेवो ! ! "

१८–४–१९३०

# वात्सल्य

शालीन एकाच विचारांत गढून गेला होता. त्याचे काळे कुरळे लांब केंस अस्ताव्यस्त झाले होते. त्याच्या शुभ्र, विस्तीर्ण कपाळाला दोनतीन खोल आंठ्या पडल्या होत्या. हृदयांत चाललेल्या सूक्ष्म द्वंद्वांचें प्रतिबिंब त्याच्या मोठाल्या पाणीदार, भेदक डोळ्यांत पडलें असून त्यामुळें त्याचा चेहरा निस्तेज व उदासीन दिसत होता.

आकाशांतील ढगांचे रंग क्षणोक्षणीं बदलत होते. क्षणांत पिंजून ठेवलेल्या शुभ्र, विरल कापसाच्या गठ्ठयांवर सुवर्णोदक शिंपडावें त्याप्रमाणें कांहीं ढग दिसत, तर क्षणांत त्यांच्या कडांत गुलाल भरल्याप्रमाणें त्यांची छटा क्रमाक्रमानें बदलत जाई. नदीवरून येणाऱ्या वाऱ्याच्या झुळकांत क्षणोक्षणीं फेरफार होई. क्षणांत लहान गोंडस बालकानें मधुर करस्पर्श करून पळून जावें त्याप्रमाणें कांहीं वायुलहरी अंगाला मधुरपणें

गुदगुदल्या करून सुखसंवेदना उत्पन्न करीत, तर क्षणांत अंगाखांद्यावर लोळून मस्ती करणाऱ्या आडदांड मुलाप्रमाणें अंगाला झोंबत. पुढें वहात असलेल्या नदीच्या शान्त पृष्ठभागावर वाऱ्याच्या ताडनानें किंवा नौकांच्या गतीनें निरनिराळ्या आकृती उमटत होत्या. झाडांचीं पानें बदलत्या रंगाच्या किरणांमुळें विविध रीतीनें चमकत होतीं.

शालीनची आई त्याला म्हणे : " बाळ, तूं आतां लग्न कर. त्याशिवाय तुझ्या आयुष्याला स्थिरता येणार नाहीं, अन् तूं सुखी होणार नाहींस."

—आई, लग्न झालं तर मी दुःखी होईन—शालीन तिचें समाधान करी.

या संबंधींच तो आतां विचार करीत होता. त्यानें जवळच असलेलें मोलियरचें " D. Juan " हें नाटक उघडून त्यांतील खालील ओळी फिरून वाचल्या. " Les inclinations naissantes après tout, ont des charmes inexplicables et tout le plaisir de l'amour est dans le changement " त्याच्या स्वाभाविक प्रवृत्तीला या वाक्यानें दुजोरा मिळाला.

त्याचा मित्र सुशील आतां त्याच्याकडे आला. शालीनच्या चेहऱ्याचें निरीक्षण करीत त्यानें म्हटलें.

—तुझ्या मनांत कोणते विचार चालले आहेत तें मी सांगूं का ?

—सांग पाहूं माझ्या मनांत काय चाललं आहे तें ? —चेहऱ्यावरील स्वाभाविक भाव लपवून, तेथें कृत्रिम हास्य खेळवीत शालीननें म्हटलें.

—आपल्या लग्नासंबंधीं विचार चालविला आहेस तूं, खरं कीं नाहीं ?

—वा ! सुशील, आतांच्या तरुणांना लग्नाशिवाय कांहींच सुचत नाहीं. लग्न आणि मुलं यांतच तुमचा सगळा संसार गुरफटलेला. —शालीन तुच्छतेनें हंसून म्हणाला. त्याच्या उद्गारांत नेहमीप्रमाणें स्त्रियांसंबंधीं उपहासाचा स्वर वहात होता. पण त्याच्या चेहऱ्यावर दांभिकपणाचा भाव पसरला होता.

—शालीन, स्त्रियांच्या बाबतींत तूं किती अन्यायी अन् कठोर

आहेस रे! सौंदर्याशिवाय स्त्रियांत उच्च गुण आहेत हें तुला माहीतच नाहीं. तें असो, पण ती मुलगी तूं पाहिली आहेस का?

—हो, पाहिली. अन् तूं सांगण्यापूर्वीच मी कबूल करतों, कीं ती फार सुंदर आहे. मी कवि असतों तर तिचें काव्यमय वर्णन करून तुला गार केलं असतं. पण मी पडलों गद्य माणूस. तेव्हां गद्यांतच तिचं वर्णन केलं तर तूं मला क्षमा करशील अशी मला आशा आहे.

—शालीन सदान्कदा स्त्रीजातीची थट्टा करायची तुला खोडच लागली आहे!

—सुशील, त्या सुंदर कुमारिकेचं वर्णन करीत असतांना मला असा अडवूं नकोस. वर्णनाला कुठून सुरवात करूं? केंसापासून कीं पायांच्या तळव्यांपासून—मिस्कीलपणानें शालीन हंसत म्हणाला.

—आतां थट्टा पुरे झाली. मीं तुला आतां अगदीं उघड विचारतों, ती मुलगी सुंदर आहे हें तूंच कबूल करतोस. हिचे डोळे किती सुंदर आहेत! हरिणीचे डोळे तूं कधीं पाहिले आहेस का? कोणत्यातरी आश्चर्यानें नेहमीं किंचित् विस्फारित झालेले असे, अजाण, पण मधुर असहाय्यतेची, परावलंबित्त्वाची मनोहर छटा त्यांत मुग्धपणें तरळट असलेली. जणूं काय तुझ्यासारख्या एखाद्या आधाराच्या शोधांत तिची नजर असलेली. अन् तिची अंगकांति! तुला खरं सांगूं? मी विवाहित नसतों तर मी आपण होऊन तिला मागणी घातली असती!

—तिचं वर्णन करण्याचा मोह आवरत नाहीं वाटतं तुला...बरं पुढं? तिचा केशकलाप अन् तिचं नाक, अन् तिचा ... पण हं पहा सुशील, वर्णन मात्र सगळ्या अवयवांचं केलं पाहिजेस अं!—असें म्हणून शालीन फटकळपणानें सहेतुक हंसला. थट्टेच्या आनंदानें त्याचे भेदक डोळे चमकले.

शालीनच्या तोंडावर हात ठेवीत सुशील गंभीरपणाचा आव आणून म्हणाला: "स्त्रियांसंबंधीं थोडा तरी आदर बाळग रे. जगांतील पवित्र गोष्टींची इतकी हेटाळणी कांहीं बरी नाहीं.

—बरं; पण त्या मुलीसंबंधीं तूं काय सांगत होतास?—शालीननें

वर बदलून विचारलें. स्त्रियांबद्दलच्या आपल्या खऱ्या भावना सुशीलला स्पष्ट शब्दांत सांगून टाकाव्या असा त्यानें बेत केला.

—ती मुलगी तुला पसंत असली तर तिच्याबरोबर तूं लग्न करावंस, अशी तुझ्या आईची इच्छा.

—मुलगी सुंदर असली म्हणजे ती मला सुखी करूं शकेल असं तुला वाटतं ?

—लग्न हा निसर्गाचा क्रम, तो मोडून तूं सुखी होशील, असं तुझं म्हणणं आहे का ?

—लग्नाचा मुख्य आधार म्हणजे प्रेम. तें असलं तर संसार सुखाचा होतो. संसारांत नवरा बायकोमध्यें नेहमींच प्रेम टिकून रहातं असं तुला वाटतं ?

—तुझे प्रश्नच विचित्र ! ...

—प्रेम म्हणजे शारीरिक आकर्षण. तें शिथील झालं म्हणजे प्रेम संपलं.

—पण प्रेमांत शिथिलता उत्पन्न होईल म्हणून कोणी लग्न करायचं ठेवलं आहे ?

—सुशील, तूं मला पाहिजे तर अनीतिमान म्हण. पण स्त्री ही एक भोगाची वस्तु आहे असंच मी मानतों. तुम्ही विवाहाचे पुरस्कर्ते देखील तसंच मानतां; पण दांभिकपणानं स्त्री ही पवित्र आहे, स्त्री ही देवता आहे, अशी ठराविक भाषा तुम्ही वापरतां. स्त्रिया ज्या भावनेनं पुरुषांकडे पहातात त्या भावनेनं ते स्त्रियांकडे पहातात असं तुला वाटतं ? स्त्री ही एक भोगवस्तु आहे यापेक्षां वेगळी दृष्टी आम्हां पुरुषांची असते काय ?

—म्हणजे ! स्त्री ही कुटुंबांतील, समाजांतील आदरणीय व्यक्ति आहे हें कोणीही अमान्य करणार नाहीं. तूं नास्तिक, पवित्र गोष्टींची थट्टा करणारा म्हणून असं बोलतोस.

—स्त्री ही पवित्र आहे, ती गृहदेवता आहे इत्यादि गोष्टी भटांच्या तोंडांत व धार्मिक ग्रंथांत शोभतात. पण खरोखर ती उपभोगाची वस्तु आहे हें तूंच कबूल करशील.

—नाहीं, तें मी कबूल करणार नाहीं. कुटुंबांत स्त्रियांचें स्थान इतकं निंद्य नाहीं. तिचं कार्य किती पवित्र !

—पुरुषाच्या विषयवासनेची तृप्ति करण्याचं कार्य पवित्र खरं ! सुशील, पुरुषार्थ साधनाकरितां आम्ही लग्न करतों असं का तुला वाटतं ? आपली वंशपरंपरा चालावी, हा काय विवाहाचा खरा हेतु असतो ? केवळ संभोगेच्छा हाच त्याचा हेतु ? तूं मला अनीतिमान म्हण, पण तुमच्याप्रमाणं दांभिक होणं मला नको आहे. तुम्ही विवाहित लोक अनीतिमान अन् दांभिक असतां. लग्न झालं तरी तुमचा व्यभिचार, निदान मानसिक व्यभिचार चालू असतोच. पण अत्यंत हीन, स्वार्थी दृष्टीनं स्त्रीचा उपभोग घेऊन देखील ती पवित्र आहे, आदरणीय आहे असा तुम्ही भास उत्पन्न करतां !—शालीन आवेशानें म्हणाला.

—शालीन, मग तूं लग्न करणार नाहींस म्हणतोस ?

—पुढल्या गोष्टी मी बोलत नाहीं. पण आज मला असं वाटतं ? कीं, स्त्री ही एक उपभोग्य वस्तु आहे. स्त्रीकडे मी याच दृष्टीनें पहातों. ज्याला आम्हीं प्रेम म्हणतों ती भावना फार अस्थिर आहे. तारुण्य अन् सौंदर्य असेपर्यंत प्रेम असणार. नंतर संसाराला निरसता आलीच. हें टाळायचं तर विवाहित स्त्रीशिवाय इतर स्त्रियांच्या संगतींत राहिलं पाहिजे. अर्थात् हा एवढा खटाटोप करण्यापेक्षां लग्न न झालेलं काय वाईट !

—मग तूं धर्मनिषिद्ध स्त्रीसंगाचा मार्ग पत्करणार ?—सुशिलनें जड स्वरांत विचारलें.

—हो, अवश्य ! त्यांत काय आहे ? स्त्री ही मला धर्मकार्याकरितां नको आहे; माझ्या सुखाकरितां पाहिजे आहे; मग एकाच स्त्रीचं लोढणं गळ्यांत बांधून घेऊन तिच्याबरोबर नीरस सहवास करण्यापेक्षां, मन मानेल त्या स्त्रीशीं पाहिजे तितका काळ सहवास करणं काय वाईट ?

—मग मुलांचं सुख तुला लाभणार नाहीं.

—सुख कीं दुःख ! ठराविक कल्पनाच तूं बडबडत सुटला आहेस. मुलांपासून सुख मिळतं असं का तुला वाटतं ? मुलं आपल्या भोग-

वृत्तीचा अपरिहार्य परिणाम आहे. मुलं झालीं कीं आयुष्यांतील स्त्रीजन्य आनंद समूळ नष्ट होत असला पाहिजे. आयुष्यांत मी मुलांना जमेस धरीत नाहीं. सुखाचं साधन या नात्यानं मी स्त्रीला महत्व देतों. मुलांची माता या दृष्टीनं मला स्त्री नको आहे.

— मुलांची माता या स्वरूपांतच स्त्री खरी मोठी दिसते. तूं भावना-शून्य मनुष्य. प्रत्यक्ष प्रसंगानं तुझ्या भावना बदलल्याशिवाय वादविवादानं तुझं मतांतर होणार नाहीं. स्त्रीचं पावित्र्य अन् मुलांचं महत्त्व या गोष्टी तुला अनुभवानं कदाचित् पटतील.

— स्त्री ही पवित्र आहे व मुलं हीं संसारांतील सुखस्थानं आहेत, या सांकेतिक कल्पना मला मान्य नाहींत त्याला मी काय करूं !

— मग तूं लग्न करणार नाहींस हें तुझं मत कायम समजायचं काय ?

— स्त्रींत भोग्य बाजूशिवाय इतर कांहीं तरी वेगळं आहे याची प्रचीति आल्याशिवाय लग्न होऊन मी इतरांप्रमाणें दांभिक बनणार नाहीं — शालीननें आपला निश्चय जाहीर केला.



— किती वेळ केलात आपण आज इथं यायला ? — मीना उत्सुकतेनें म्हणाली. तिची नेहमींच हंसरी असणारी मुद्रा आज जास्तच प्रसन्न दिसत होती. नीलाकाशाशीं निर्मलपणांत स्पर्धा करणारे तिचे नेत्र हंसरेपणामुळें फार मोहक दिसत होते. स्वच्छ सरोवराच्या स्फटिकवत् पृष्ठभागावर चंद्रिका खेळूं लागतांच वेगळीच दीप्ति उत्पन्न होते, त्याप्रमाणें तिच्या डोळ्यांत वेगळेंच आकर्षक तेज चमकत होतें. तिच्या प्रमाणशीर, सरळ नाकांत हिऱ्याची चमकी चमकत होती. किंचित् लांबट हनुवटीला हिरवी तीट गोंदलेली होती व बारीक कानांत मोत्यांच्या कुड्या होत्या. यामुळें एखाद्या सुंदर चित्रांत वेगवेगळ्या रंगांच्या मिश्रणानं मनोहरपणा उत्पन्न व्हावा त्याप्रमाणें तिचा गोंडस चेहरा शोभत होता.

शालीन घराच्या पायऱ्या हंसत हंसत चढला व दाराशीं स्वागत करण्याकरितां उभ्या असलेल्या मीनेचा हात दाबून त्यानें जोरानें हस्तां-

दोलन केलें. मीनेनें आपल्या सगळ्या देहाला चटकन् कलायुक्त बांक दिला व शालीनला घेऊन ती आंत आली.

शालीनला खूष ठेवण्याकरितां ती किती झटत होती! त्याचें मनोरंजन व्हावें म्हणून तिनें त्या खोलींत किती सुंदर व्यवस्था ठेवली होती! शालीनच्या माथ्याची टोपी मीनेनें काढून घेतली, व त्यानें पुढें केलेला कोट हातांत घेतला. शालीननें तिच्याकडे अभिमानानें पाहिलें. तिचें अंगसौष्ठव आश्चर्यकारक होतें. तिचा केशसंभार तिच्या मानेवर गळून आल्याप्रमाणें बसला होता. गुलाबी पातळ तिच्या गोंडस व सुटसुटीत अवयवांना फार शोभून दिसत होतें.

—या दिवसांत आपण इतका उशीर कां करतां?—मीनेनें अधीरतेनें प्रश्न केला.

—एरवींच. काम असलं म्हणजे उशीर होतो. पण आज तूं नेहमीं-पेक्षां किती सुंदर अन् आनंदी दिसतेस! सायंकाळच्या वेळीं स्वच्छ आकाशांत शुभ्र ढगांवर रंगाची मनोहर पसरवण व्हावी, डोंगराच्या हिरव्या माथ्यांवर सूर्यबिंब टेकलेलं असावं व त्याच्या सौम्य उन्हांत आसपासची सृष्टि नहात असावी, म्हणजे जशी शोभा वाटते तशी शोभा तुला पाहून मला वाटली!

—आपणाला आनंदी ठेवण्याकरितां मला सुंदर दिसायला पाहिजे, नाहीं का?—मीनेनें लाजल्याप्रमाणें दाखवून म्हटलें.

—पण तूं नेहमींच अशी सुंदर रहाशील का? तुझा हा आजचा आनंद नेहमींच टिकेल का?

—माझं सौंदर्य न टिकलं तरी माझा आनंद, आपल्या सहवासांत असाच टिकेल. माझं सौंदर्य कदाचित् नष्ट झालं तरी सौंदर्याशिवाय आपणाला आकर्षण घालूं शकेल असं माझ्या अंगांत कांहींच नाहीं का?—तिनें किंचित् कंपित स्वरांत म्हटलें. तिच्या भावना उचंबळून आल्या.

—मला मोह पाडणारं सौंदर्याशिवाय तुझ्याकडे काय आहे?

—माझ्याकडेच नव्हे तर प्रत्येक कुरूप किंवा सुरूप स्त्रीच्या अंगांत आपल्या पुरुषाला अंकित करण्यासारखं कांहीं तरी असतंच.

—असेल. पण मला मात्र सौंदर्याशिवाय कांहींच अंकित करूं शकत नाहीं. व तें सौदर्यदेखील ठराविक वेळेपर्यंतच मला पाहिजे. हें उत्तर ऐकून मीनेला वाईट वाटलें. ती कलावन्तीण खरी, पण शालीनच्या सुखाकरितां ती किती झटत होती! त्याच्यावर ती प्रेमदेखील किती करीत असे! तिच्या प्रेमांत स्वार्थ होता, पण कपट नव्हतें. ती जातीची कलावन्तीण. तिला अनीतीचें भय नव्हतें. पण शालीनच्या सहवासांत असतांना तिनें दुसऱ्या पुरुषाला आपल्या घरांत घेतलें नव्हतें. त्याच्याच सहवासांत सदैव रहावें असें तिला वाटत असे. पण शालीनची वृत्ति भ्रमरासारखी! स्वैरपणें स्त्रियांचा उपभोग घ्यावयाचा व त्यांच्या हृदयांत सहवासानें प्रेम उत्पन्न झालें म्हणजे त्यांना कठोरपणें टाकून जायचें!

मीनेनें विचारलें: "स्त्रीपुरुषांच्या सहवासांत आपण प्रेमाला महत्त्वच देत नाहीं काय?"

—प्रेमाचं अधिष्ठान सौंदर्य हेंच नाहीं का?—शालीननें प्रश्न केला.

—हृदय हेंच प्रेमाचं स्थान,—मीना म्हणाली.

—तुम्हीदेखील हृदयानंच प्रेम करतां का?—शालीननें उपरोधिक प्रश्न केला.

—प्रेम करतांना आम्हीं हृदय ताब्यांत ठेवतों. व्यवसायाची दृष्टि आम्ही सहसा सोडीत नाहीं. पण केव्हां केव्हां आपल्या आयुष्याच्या स्थिरतेकरितां आम्हीं हृदयसर्वस्व पुरुषांना देऊन टाकतों.

—निःस्वार्थ रीतीनं का?

—निःस्वार्थपणं कोण काय करतं? विवाहित स्त्रिया तरी आपल्या नवऱ्यावर निःस्वार्थपणं प्रेम करतात का? त्यांना नवऱ्यापासून कोणतंच सुख मिळालं नाहीं तर त्या नवऱ्याशीं बेइनाम होत नाहींत का?

हा विषय येथेंच संपला. दोघेंहि थोडा वेळ गंभीरच राहिलीं. नंतर मीना शालीनजवळ येऊन बसली व त्याच्या केंसावरून लडिवाळपणें हात फिरवीत म्हणाली: "आपण एक परवानगी द्याल ना?"

—परवानगी द्यायला मीं का तुला बांधून ठेवली आहे? मी जसा स्वतंत्र तशी तूं स्वतंत्र. माझ्या परवानगीची तुला काय जरूर?

—तसं नाहीं. पण आपणाला न सांगतां मी कांहीं करतें का ? आपण माझ्याकडे असं परक्यासारखं कां वागतां ? मला स्वतंत्रता नको. आपलं बंधन पाहिजे.

—पण तुला बांधून ठेवायचं तर मी देखील बांधून असायला नको का ? तें मला नको. मी स्वतंत्र अन् तूं बंधित ! हें कसं शक्य आहे ?

—कसलंहि साधं बोलणं काढलं तरी हल्लीं आपण वादविवाद कां उपस्थित करतां ?

—बरं, कोणती परवानगी मागत होतीस तूं ?

—बोरीच्या सावकारांच्या घरीं गाण्याच्या जलशाला आमंत्रण आलं आहे मला. तें मी स्वीकारूं का ?

—कां नाहींस स्वीकारणार ? हा तुझा पेशाच नाहीं का ?

—पण आपली इच्छा नसली तर मी जाणार नाहीं. आपल्या आवडीसाठीं मी पैशांकडे दुर्लक्ष करायला तयार आहें.

—पण मी कां जाऊं देणार नाहीं तुला ? तुझ्यावर माझा एकट्याचाच अधिकार आहे का ?—शालीननें म्हटलें. पण तसें बोलतांना त्याला मनापासून वाईट वाटलें. तिनें कुठेंहि जाऊं नये, आपल्या सुखाकरितां तिनें सगळा त्याग करावा असें त्याला वाटलें. पण तें त्यानें बोलून दाखविलें नाहीं.

—हें पहा, आपण माझ्याबद्दल इतके उदासीन असलां तरी माझी वृत्ति आपणाबद्दल तशी नाहीं. मी या जलशाला जात नाहीं. जलशाला जाऊं नकोस, असं आपण मला सांगितलं असतं तर मला किती आनंद झाला असता ! पण आपण किती निर्विकारपणें वागतां माझ्याशीं ! —तिनें निःश्वास टाकीत म्हटलें.

शालीनला आपली हीन दृष्टि कळल्याशिवाय राहिली नाहीं. ती एरवीं कलावन्तीण. पण तिच्या बोलण्यांत, तिच्या वागण्यांत किती प्रेम, किती जिव्हाळा आहे ! पण आपल्या वागणुकींत एका वैषयिक दृष्टीशिवाय अधिक काय आहे ? तिच्या आशा-आकांक्षांशीं समरस होणें

मला नको. तिच्या सुखदुःखाच्या इतर गोष्टी मला नकोत. तिचें सौंदर्य व यौवन हें मात्र मला पाहिजे. तिच्या सुंदर देहाकडे उपभोगाच्या दृष्टीनें पहात बसणें मला हवें, तिच्या भावना मला नकोत. तिचें शुभ्र उन्नत वक्षःस्थल पहातांना मी सगळें विसरतों. पण त्याच्या आंत धडधडणारें तिचें मधुर हृदय मला नको ! ... याप्रमाणें तो विचार करूं लागला.

तिला बरें वाटावें म्हणून त्यानें म्हटलें: "मिनी, सावकारांच्याकडे जलसा करणार नाहींस तर माझ्यासमक्ष तरी कर."

— पण सावकार देणार असलेला विडा आपण द्याल ना मला ? — मिनीनें हंसत हंसत म्हटलें.

— विड्याचा डबा बाहेर आणून ठेव म्हणजे करून देईन मी तुला विडा.

मीनेनें विड्याच्या सामानाचा डबा बाहेर आणला व तंबोरा घेऊन ती गायला बसली.

आज चारपांच दिवस मीना अस्वस्थचित्त दिसत होती. नेहमीं प्रफुल्ल व उल्हासित असणारी तिंची मुद्रा आतां मंद व उदासीन दिसत होती. पाण्याच्या शान्त पृष्ठभागावर मलयुक्त थर सांचावा, किंवा सुंदर निसर्गदृश्यावर धुक्याचें आवरण पसरावें तद्वत् तिच्या आनंदी, हास्ययुक्त, प्रेमळ चेहऱ्यावर विषण्णतेची छाया पसरली होती.

शालीननें तिला विचारलें: "काय होत आहे तुला ?"

— तसं कांहीं विशेष नाहीं. पण जिवाला हुशारी वाटत नाहीं, आळस वाटतो. अन्नदेखील चांगलं जात नाहीं.

— मग, डॉक्टरला आणूं का ? — त्यानें विचारलें. खरें म्हटलें तर त्याला मीनेच्या तशा त्या स्थितीचा कंटाळा आला होता. सौंदर्य व तज्जन्य आनंद एवढ्याचाच उपभोग घेण्याकरितां तो तेथें आलेला. त्याला मीनेचा आजार कसा सोसणार ? त्याला केवळ उपभोग हवा. त्रास, जबाबदारी नको. शालीनकडे प्रेमपूर्ण नजरेनें पहात व त्याच्या खांद्यावर लडिवाळपणानें हात टाकीत तिनें म्हटलें: "डॉक्टरच्या औषधापेक्षां आपले हे कळकळीचे शब्द मला अधिक प्रिय आहेत."

तिला फार आनंद झाला. शालीनची अस्थिर वृत्ति तिला माहीत होती. संसारांतील भावनात्मक बाजू त्याला अज्ञात होती. इंद्रियांना गोचर असा सुखोपभोग हाच त्याचा ज्ञातविषय. तेव्हां अशा मनुष्यानें किंचित् कळकळीनें बोललेले शब्द देखील तिला फार महत्त्वाचे वाटले.

— डॉक्टर आणूं ना ?

— नको ना ! — तिनें प्रेमळ आग्रहानें म्हटलें.

— पण काय वाटतं तुला ?

तिनें लाजल्यासारखें केलें. तिच्या चेहऱ्यावर मुग्धपणाची छटा पसरली.

— सांग ना मला ? — शालीननें फिरून विचारलें.

— काय सांगायचं ! सांगितल्याशिवाय कळत नाहीं ना आपु-ल्याला ?

— महिने गेले आहेत का ?

— तसंहि असेल. आपण त्याबद्दल कां वाईट वाटून घेतां ? — तिनें काकुळतीनें विचारलें.

— तसं झालं तर मला आनंद होईल असं तुला वाटतं ? नऊ महिने तूं आजारांत काढायचे अन् मी त्रासांत — शालीननें उदासपणें म्हटलें.

थोड्या दिवसांनीं मीनेची प्रकृति अधिकच बिघडली. डोकें दुखणें वाढलें, ओकारी सुरू झाली, छातींत धडधडूं लागलें, घेरी येऊं लागली; ही स्थिति बरेच दिवस टिकली. शालीननें डॉक्टरला आणलें. डॉक्टरनें तिची प्रकृति तपासून म्हटलें :

— ही गरोदर असल्यामुळें असं होत आहे. आणखी चारपांच महिन्यांनीं ती आपोआप बरी होईल.

शालीननें विचार केला, आतां इथून हलायचें. मीना सुंदर खरी, पण तें सौंदर्य त्याला ज्ञात झालें होतें हें एक; शिवाय त्यांत शैथिल्य उत्पन्न झालें होतें व शिवाय ती आजारी असल्यामुळें तिच्या सहवा-सांत त्याला सुख नव्हतें. दुसरें, पांचसात महिने आपण एकाच स्त्रीच्या

सहवासांत राहिलों हें फार झालें, असें त्याला वाटलें. कारण हें त्याचें आवडतें तत्त्व. त्या तत्त्वाप्रमाणें जागा बदलणें आतां त्याला प्राप्तच होतें.

केव्हां केव्हां त्याला वेगळ्याप्रकारचे विचार सुचत. मीना आपल्यापासून गरोदर राहिली, नाहीं का ? मग ती आतां आजारी म्हणून तिला टाकून जायचें ? माझ्याकरितां ती काय कमी त्याग करते ? तिचा जीव माझ्यावर आहे असें ती दाखविते तें खोटें का मानायचें !

आणखी थोड्या दिवसांनीं शालीन मीनेच्याकडे दिसेनासा झाला.



वरील प्रकाराला पांचसात महिने होऊन गेले. शालीननें मीनेचा त्याग केला व तो आपल्या सुखाकरितां इतर स्त्रियांच्या सहवासांत काळ घालवूं लागला. एकदां तो सुशीलच्या ऑफिसांत बोलत बसला होता. सुशील त्या तालुक्यांतील जन्मनोंदणीचा सरकारी मुख्य कामदार होता. त्यांचें संभाषण चालू असतांना तेथें एक इसम आला व त्यानें, एक जन्मनोंद करावयाची आहे, असें सुशीलला सांगितलें.

—कुणाच्या इथं जन्म झाला आहे ?—सुशीलेनें त्या इसमाला विचारलें.

—मीना काकोडकर आईचं नांव.

—काय झालं आहे ?

—मुलगा.

—बापाचं नांव ?

—ती कलावन्तीण.

शालीनची मुद्रा उतरली. त्याच्या नजरेपुढें मागच्या गोष्टी उभ्या राहिल्या. मीना काकोडकरला मुलगा झाला. त्याचा बाप खुद्द मी. पण त्याची जन्मनोंद करितांना त्याला बाप नाहीं, असें नमूद करायचें ?

माझा मुलगा, आणि तो कसा असेल ? या एका प्रश्नानें त्याच्या हृदयांत उसळी घेतली. लोखंडाच्या तुकड्यानें लोहचुंबकाकडे ओढ घ्यावी त्याप्रमाणें त्याचें हृदय त्याच्या बालकाकडे ओढ घेऊं लागलें.

मुलांच्या बाबतींत नेहमीं निर्विकार, उदासीन असणारें आपलें मन आतांच असें कां उचंबळून यावें याबद्दल आश्चर्य करीत त्यानें सुशीलला म्हटलें: "मी परत येईपर्यंत ही जन्मनोंद करूं नकोस."

शालीन उठला व त्या इसमाला बरोबर घेऊन तो मीनेच्या घरीं आला. "माझा मुलगा! माझा मुलगा!" हेच शब्द त्याच्या मस्तकांत व हृदयांत घुमत होते.

शुभ्र पांढरें पातळ नेसलेली मीना आपल्या मुलाला मांडीवर घेऊन बसली होती. तिच्या सौंदर्यात गांभिर्याची, उच्चतेची भर पडली होती. पूर्वीचीं कोणतींच भूषणें तिच्या अंगावर झळकत नव्हतीं. पण मांडीवर, हृदयाला बिलगून बसलेल्या महिन्याच्या गोंडस अर्भकामुळें तिचें मूळचें सौंदर्य उदात्त पण मधुर दिसत होतें. उन्हाळ्याच्या दिवसांत धुळीनें मळलेल्या वृक्षलतांवर पावसानें क्षणभर पाण्याचे चार फवारे टाकावे व नंतर उन्हाचे सौम्य किरण त्यांच्यावर पसरावे म्हणजे जशी शोभा दिसते त्याप्रमाणें मीना दिसत होती.

शालीन दृष्टीस पडतांच तिला आश्चर्य वाटलें व आनंद झाला. मुलाला हृदयाशीं धरून ती झटकन उठली. शालीननें भावनातिरेकानें मुलाला आपल्याकडे घेतलें व त्याच्यावर आपली स्निग्ध, प्रेमळ, स्वार्थरहित नजर टाकून त्याचीं चुंबनें घेतलीं! त्या मुलाचें आपल्याशीं असलेलें साम्य पाहून त्यानें मनांत म्हटलें: "माझा मुलगा! माझा मुलगा!"

त्यानें हर्षोत्फुल्ल हृदयानें मीनेला जवळ ओढून म्हटलें:

— मीना, किती सुंदर मुलगा हा आमचा!

त्यानें बाहेर असलेल्या इसमाला बोलावून सांगितलें:

— माझा मुलगा म्हणून याची जन्मनोंद कर.

आणि दोघांनींहि त्या बालकाचीं बरोबरच चुंबनें घेतलीं, व शालीनचें अस्थिर, तात्कालिक प्रेम त्या मुलावर स्थिर झालें!

४-२-१९३२

कल्पवृक्षांच्या छायेंत
प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई

# हृदयाचें समाधान

क्रिस्तीना आजच एका फिरंग्याच्या घरीं रहायला आली होती ! तें सुंदर घर पहातांच ती मनांतल्या मनांत दचकलीच. आपण किती तरी कुरूप अन् समोरचें दृश्य किती तरी सुंदर ! तिच्या मनांत विचार आला व ती पायऱ्यांवरच थबकली.

घराच्या छपरावर, कठड्यावर, पायऱ्यांवर निरनिराळ्या रंगाचीं, निरनिराळ्या आकाराचीं फुलझाडें मोठ्या अभिरुचीनें लावलेलीं होतीं. त्या शांत, प्रेमळ वातावरणांत तीं नाजूक, डौलदार झाडें, जणूं काय प्रेमाचा संसार थाटून बसलीं आहेत. अशा या प्रेमळ संसारांत प्रवेश करतांना क्रिस्तीनेला विशाद वाटलाच. कारण इतर कुणापेक्षांहि तिला आपल्या कुरूपतेची अधिक जाणीव होती.

आणि खरोखर ती फार कुरूप होती. कुणाहि पुरुषाला किळस यावा असेच तिचे एकंदर अवयव होते. तारुण्यांत कुरूप स्त्री देखील

मोहक दिसते म्हणतात. पण क्रिस्तीनेचें तारुण्य तिच्या कुरूपतेंत भरच घालीत होतें.

या नव्या घरांत तरी आपल्याला प्रेमळपणा लाभेल का? कीं मागचाच कडू अनुभव येथेंहि येईल? हा विचार तिच्या मनांत आल्याशिवाय राहिला नाहीं.

इतक्यांत ज्युलिया बाहेर आली. अवघीं अठरा वर्षें. चेहऱ्यावर सौम्य स्मित. नजरेंत प्रेमळपणा व आनंद. त्या नाजूक वेलींच्या सान्निध्यांत रहावें असें रूप.

तिला पहातांच क्रिस्तीनेनें हळूच उजव्या हातानें आपल्या झग्याचा फाटलेला भाग झांकण्याचा प्रयत्न केला. आपल्या दरिद्री पोशाकाचा मळकटपणा तिला ज्यास्तच वोंचला व तिनें लाजेनें मान खालीं घातली.

— कुणाला शोधतेस? — ज्युलियेनें प्रश्न केला.

क्रिस्तीनेनें मान वर केली व तिच्या हंसऱ्या डोळ्यांकडे पहात म्हटलें :

— मी आपल्याचकडे रहायला आलें आहें.

हें बोलतांना तिनें आपल्या आवाजांत शक्य तितकें मार्दव आणण्याचा प्रयत्न केला. पण मूक संगीतानें भारावलेल्या त्या वातावरणांत तिचा स्वर किती तरी कर्णकटु वाटला!

ज्युलियेचें सौंदर्य व प्रेमळपणा यांचा परिणाम कुणाहि स्त्रीच्या मनावर झाला असता. क्रिस्तीना तर सौंदर्य व प्रेम यांना हपापलेलीच होती. तिची नजर ज्युलियेच्या सडपातळ व गोंडस देहयष्टीकडे गेलीच. पण तिचा किंचित् तांबूस गोरेपणा तिनें घातलेल्या रेशमी हिरव्या झग्यानें फारच खुलून दिसत आहेसें तिला वाटलें. जणूं काय कोंबडीनें नुकतेंच घातलेलें अंडेंच, किंवा गोऱ्या अर्भकाच्या पायांचे तळवेच. तिच्या हातांत हिऱ्याची अंगठी होती. गळ्यांत मोत्यांची माळ होती. पण यापेक्षांहि अधिक आकर्षक असें तिच्याजवळ कांहीं होतें, आणि तें म्हणजे तिचे दांत!

इतके सुंदर दांत क्रिस्तीनेनें कुठेंच पाहिले नव्हते! स्वतः तिचे दांत

तर अगदींच बेढब होते. तिलाच त्यांची किळस येई. तिचे दांत दिस-तांच लोकांची नजर तिच्याकडे उपहासानें वळे. आतांपर्यंत ती पांच दहा घरांत राहिली होती. सुस्वरूप बायका तिनें पाहिल्या होत्या. पण इतके सुंदर दांत! आणि ज्यावेळीं ज्युलियेनें तिला वरील प्रश्न केला त्यावेळीं त्या प्रश्नांतील आशयाकडे लक्ष जाण्यापूर्वी तिची नजर ज्युलियेच्या मोत्यांप्रमाणें दिसणाऱ्या त्या सान शुभ्र दंतपक्तीकडे गेली व त्यांतून स्रवणाऱ्या सूक्ष्म मधुर हास्यानें तिचें मन वेडावून गेलें!

—लुइसेनें पाठविली का तुला? मला मोलकरणीची गरज आहे असें मी म्हटलें होतें तिला. मग रहातेस ना तूं आमच्याकडे?

—आनंदानें राहीन मी तुमच्याकडे—क्रिस्तीनेनें कृतज्ञतापूर्ण स्वरांत म्हटलें. पहिल्याच भेटींत इतक्या प्रेमळपणानें वागणारी स्त्री तिला ज्युलियेशिवाय दुसरी आढळली नव्हती.

—मग तुझा पगार सांग पाहूं?

गांवांतून फिरणारे रेडे धवाडा इसम दिसतांच ज्याप्रमाणें त्याच्या-कडे पहात रहातात तशा प्रकारें ज्युलियेकडे पहात क्रिस्तीना म्हणाली:

—मला पगाराची गरज नाहीं. आपण मला हवें तें दिलें व आपले-पणानें वागविलें म्हणजे झालें.

तिनें असलें उत्तर यापूर्वी कुणाहि धनिणीला दिलें नव्हतें. पगारासाठीं तिनें नेहमीं ओढून ताणून धरावें, व पगार वाढवीत नाहींत म्हणून नोकरी सोडून जावें. पण तीच क्रिस्तीना आतां म्हणत होती 'मला पगार नको.'

—तुझें नांव काय?

—क्रिस्तीना!

—क्रिस्तीना, तुला पगार नको?—इतकें म्हणून ज्युलियेनें आपल्या निळ्या डोळ्यांनीं क्रिस्तीनेचें अंतरंग पहायला सुरवात केली.

—नको! मला हवें असलेलें, सुदैवानें मला इथेंच मिळेल.

—तुझें अजून लग्न झालें नाहीं वाटतें? खरें ना?

क्रिस्तीनेनें डोळे जमिनीकडे लावले व सुस्कारा टाकला!

—इथें या खुर्चीवर जरा बस. मी आंत जाऊन येतें—आणि ज्युलिया आंत गेली.

त्या घटकेला किती तरी विचारांनीं क्रिस्तीनेच्या मनांत गर्दी केली.

ती लग्नाकरितां तळमळत होती. पुरुषाच्या प्रेमाला ती हपापली होती. पण ती कुब्जा ! तिला नवरा कुठून मिळणार ? तिचें सान्निध्य, तिचा सहवास प्रत्येक तरुण टाळूं पाही. तरुणांनीं निरखून पहाण्याचें, तिच्याकडे पाहून हंसण्याचें, तिच्याशीं गुजगोष्टी करण्याचें भाग्य तिला अजून लाभलें नव्हतें. तरुण तिला पहात. पण तिची चेष्टा, उपहास करण्याकरितां. ज्या ज्या घरांत ती राही त्या त्या घरांतील नोकरां-चाकरांशीं मैत्री करण्याची तिनें खटपट करावी. पण कुणालाच तिच्या मनाची ओढ समजत नव्हती. तिला पहातांच सगळेजण दचकून मागें सरत. एका म्हाताऱ्या गाडीवानानें तिच्याकडे आपली लोभी नजर टाकली होती. तिच्याकडे बोलण्याचा, तिच्याशीं लगट करण्याचा प्रयत्न केला होता. एवढीच तिची प्रणयविषयक आठवण ! बाकी सगळा रखरखाट !

तरुणांचें प्रेम नशिबांत नसलें तरी लोकांनीं तरी तिला प्रेमळपणानें, आपलेपणानें वागवायचें होतें. पण तेंहि नाहीं. सगळ्यांनींच तिचा धिक्कार करावा. तिरस्कार करावा, घरच्या बायका आपल्या गोजिरवाण्या बाळांना तिच्याकडे द्यायला भीत. जणूं काय तिच्या स्पर्शानें तीं चुरगळून जातील ! क्षुल्लक गोष्टीसाठीं तिच्याकडे भांडत, तिला मारायला येत. चवताळलेल्या वाघिणीप्रमाणें ती देखील उलट भांडे. इतरांचा प्रेमळ संसार पहायला भाग्य लागतें, पण तें देखील तिच्या नशिबांत नव्हतें. आणि म्हणूनच आतां ज्युलियेचें सौंदर्य व प्रेमळपणा पाहून ती आनंदित झाली.

इकडे येण्यापूर्वी ती एका युरोपियनाकडे होती. पण तो म्हातारा होता आणि त्याला बायको नव्हती. ख्रिस्तीनेचें मन त्या शून्य, उदास वातावरणांत रमलें नाहीं. ती तेथून निघाली.

त्यापूर्वी ती एका तरुण सार्जंटाच्या घरीं होती. पण तो बायकोकडे कधींच प्रेमळपणानें वागत नसे व दारू पिऊन नेहमीं तिला मारी.

याप्रमाणें ती किती तरी घरें फिरली होती. पण तिच्या तरुण मनाला रुचण्यासारखें एकहि स्थळ तिला लाभत नव्हतें. हीं मागचीं दृश्यें क्रिस्तीनेच्या मनांत आतां झराझर येऊन गेलीं.

ज्युलिया लगेच बाहेर येऊन म्हणाली :

— क्रिस्तीना, तुला पाहिजे तसें कर. पण हे तुझे कपडे तूं आतां बदलले पाहिजेस. समजलीस ?

क्रिस्तीनेनें फिरून आपल्या मळक्या व फाटक्या कपड्यांवरून नजर फिरविली. व आपल्याकडे चांगले कपडे नाहींत, मग हे बदलायचे कसे हा तिला प्रश्न पडला.

पण ज्युलिया लगेच म्हणाली :

— तुझ्याजवळ नसतील चांगले कपडे, होय ना ? मग मी देतें माझे निकामी झालेले.

क्रिस्तीनेला बरोबर घेऊन ती घरांत गेली. व तिनें एक मोठी आरमार उघडून, दोनतीन झगे काढून तिच्या अंगावर टाकले व हंसत हंसत म्हटलें :

— हें पहायचें अं. आजपासून हे कपडे घालीत जा. माझ्या लुईशला निर्मळपणाची भारी आवड.

कपडे पाहून क्रिस्तीनेला कितीतरी आनंद झाला ! किती उंची कापडाचे होते ते ! जरा जुने झाले होते इतकेंच. ज्युलियेनें तिला नेमून दिलेल्या खोलींत जाऊन तिनें एक झगा घातला. त्या विरळ उंची वस्त्राच्या स्पर्शानें तिच्या करपून गेलेल्या मनांत वेगळ्याच संवेदना उत्पन्न झाल्या !

— क्रिस्तीना, जरा इकडे ये पाहूं.

— Minha senhora ! — आणि क्रिस्तीना बाहेर आली.

— आतां किती बरी दिसलीस तूं क्रिस्तीना ! माझा लुईश यायची वेळ झाली आतां. तुला पाहून त्याला फार बरें वाटेल.

क्रिस्तीना मनांतल्या मनांत गहिंवरून गेली. 'तूं बरी दिसतेस' या ााक्यानें तिच्या हृदयांत नाजूक गुदगुदल्या झाल्या.

ज्युलियेनें नंतर फार काळजीनें केशरचना केली. गालांना गुलाबी रंग चोळला. आरशांत पाहून मोत्यांची माळ गळ्यांत बरोबर सरकावली. ओंठ विलग करून आपल्या दांतांचें वैभव पाहिलें. मुद्दाम स्मित करून आपल्या चेहऱ्याची शोभा अवलोकन केली. झग्याचा गळा दोन्ही हातांनीं किंचित् दूर करून आपल्या वक्षःस्थळावर नज़र टाकली आणि क्रिस्तीनेकडे वळून म्हटलें: "तूं नाहीं टॉयलेट करीत?"

क्रिस्तीना लाजली. कुरूप स्त्रीनें टॉयलेट ती काय करायची? हा प्रश्न तिच्या मनांत उद्भवला.

इतक्यांत बाहेर मोटारीचें शिंग वाजलें. घरांतला नोकर धांवतच मोटारीपाशीं गेला. त्यानें मोटारचें दार उघडलें. आपल्या मालकाची बॅग व इतर कांहीं सामान हातांत घेतलें व मुकाट्यानें तो घरांत गेला.

लुईश मोटारींतून उतरला व घरच्या पायऱ्या चढूं लागला. एखाद्या लहान बाळकाप्रमाणें, त्याच्याजवळ येऊन ज्युलिया म्हणाली:

— Meu caro Luis! Tu és tăo mau! Como posso ficar sózinha tanto tempo na tua ausência! (माझ्या आवडत्या लुईशा! तूं किती वाईट आहेस रे! तूं नसतांना इतका वेळ मी एकटी कशी राहूं!)— तिच्या या उद्गारांत किती प्रेम, लाडिकपणा, रुसवा भरला होता, हें काय तरुणांना सांगितलें पाहिजे?

लुईशनें तिला जवळ ओढली. एखाद्या अल्लड मुलीप्रमाणें तिच्या कपाळाचीं, केंसाचीं, गालाचीं किती तरी चुंबनें घेतलीं. त्याच्या हातून सुटका करून घेण्याकरितां ती कृत्रिम धडपड करीत म्हणाली:

— Deixa-me! Deixa-me! (मला सोड पाहूं!)

क्रिस्तीना विचित्र मनःस्थितींत हें दृश्य पहात होती. लाज, भय, आनंद, प्रेम इत्यादि वेगवेगळ्या भावनांनीं ती अगदीं गोंधळून गेली होती.

ती, मालकिणीच्या आज्ञेप्रमाणें, कांचेचीं तावदानें ओल्या फडक्यानें पुशीत होती. पण तिचें मन पहात असलेल्या दृश्यामुळें एक प्रकारच्या

गूढ आनंदानें भरून राहिलें होतें. बावीस वर्षांची तरुणी. तीहि कुरूप आणि त्यांतहि कुमारिका ! तिच्या मनाची तुम्हीच कल्पना करा. स्वतःला एखादें सुख लाभत नसलें म्हणजे इतरांचें तसलें सुख तादात्म्यानें पाहून त्यांतच रंगणारीं माणसें कांहीं असतात, नाहीं का ? क्रिस्तीनेचें असेंच झालें. लुईशचें प्रणयसौख्य पाहून तिलाहि अपरिमित सुख झालें.

लुईशनें एनामेलच्या एका वाटोळ्या तस्तांत तोंड व हात धुतले व तो जेवणाच्या खोलींत आला.

खोलीच्या मध्यभागीं एक चौकोनी मेज ठेवलें होतें. त्यावर पांढरा स्वच्छ कपडा घातला होता व त्यावर चमचे, मांस खाण्याचे कांटे, दोन चार सुऱ्या, मदिरेच्या दोन तीन वाटल्या व दोन फूलदाण्या मांडून ठेवल्या होत्या.

मेजाच्या दोन्ही बाजूंना एकमेकांकडे तोंड करून लुईश व ज्युलिया बसलीं. ज्युलिया म्हणाली :

— मला इथें अगदीं कंटाळा येतो.

— अन् मला ऑफिसांत कंटाळा येतो.

— पण तुला बाहेर हवें तेथें फिरायला मिळतें.

— अन् मला तुझी आठवण काढीत बसावें लागतें !

— माझ्या बरोबर कां नाहींस येत !

— काय करायचें तुझ्या बरोबर येऊन ? तूं काम करणार अन् मी ?....

— माशा मारीत बस ! पण हें सांग आधीं. आज क्लबांत कां नाहीं गेलीस तूं ? आतां तिथें नाच होता ना ?

— तुझ्याशिवाय जायचें ? उद्यां आपण मिळून जाऊं.

— शिंपिणीनें नवे झगे आणलेत का तुझे ? आतांची moda मला आवडत नाहीं मुळीं. गळ्यापासून पायांच्या टांचापर्यंत सगळा देह झांकलेला !

— लुईश, तें असो. ही नवीन बाई पाहिलीस ना तूं ? नुकतीच आली आहे ती आमच्याकडे रहायला.

— आवडली ना ती तुला ? — लुईशनें हळूच विचारलें.

— Coitado ! E' solteira e feia. Inspira-me compaixao ! (गरीब बिचारी ! ती काळी अन् कुरूप आहे. मला तिची दया येते).

— कुमारिकांची स्थिति केविलवाणी असते नाहीं का ?

— कां तें सांग पाहूं.

— तुला तें समजणार नाहीं. कारण, तुझें लग्न लवकर झालें. पण वीस पंचवीस वर्षेंपर्यंत अविवाहित रहायचें ! खरेंच तूं तिला ठेवून घेऊन फार बरें केलेंस.

— अन् ती फार प्रेमळ दिसते. क्रिस्तीना इकडे ये पाहूं ?

क्रिस्तीना मांसानें भरलेली बशी घेऊन बाहेर आली. तिनें बशी मेजावर ठेवली व म्हटलें:

— Minha senhora !

— माझा लुईश आवडला ना तुला ? तो फार प्रेमळ आहे, समजलीस ?

क्रिस्तीनेनें मान खालीं घातली. त्या जोडप्यांतला तो प्रेमळपणा, मोकळेपणा पाहून तिला फार बरें वाटलें. त्यांची चालत असलेली थट्टा, मस्करी, विनोद ती किती तन्मयतेनें ऐकत होती ! आपल्या घरांत नेहमीं भांडणें चालावीं, आणि एखाद्याच्या घरांतली मंडळी एकमेकांशीं प्रेमानें, मोकळेपणानें बोलत किंवा वागत असलेलीं पाहिलीं म्हणजे आपल्या हृदयांत गुदगुदल्या होतात व त्यांचें सुख पहाण्यांत अवर्णनीय आनंद होतो.

जेवण झालें व तीं बाहेर फिरायला गेलीं. क्रिस्तीना येत नव्हती, पण ज्युलियेनें आग्रह केला तेव्हां तीहि त्यांच्या मागोमाग आली.

जवळच समुद्राची खळबळ चालली होती. वारा जोराचा वहात होता. रस्त्यांत विजेच्या दिव्यांचा प्रकाश पडला होता. रंगीबेरंगी वेष परिधान केलेल्या बायका व मुलें समुद्राच्या कांठानें फिरत होतीं.

दोघेंहि हातांत हात गुंफून चाललीं होतीं. क्रिस्तीना त्यांच्या प्रत्येक हालचालीकडे आतुर मनानें पहात होती.

रस्ता ओलांडून तीं खालीं वेळेवर रेवेंत आलीं. ज्युलियेनें लुईशचा हात सोडला व पुढें धांवत ती म्हणाली:

—मला धर पाहूं.

लुईश तिच्या मागोमाग धावूं लागला. ती देखील किती चपळतेनें धांवत होती! मध्येंच रेवेंत पडत होती व लुईश जवळ येत असलेला दिसतांच चटकन् उठून धांवत होती.

शेवटीं लुईशनें तिला पकडली. तिला घट्ट आंवळून धरलें व तिचीं चुंबनें घेतलीं.

समुद्र उल्हासानें नाचत होता. वारा गाणें गात होता. नदीचें मुख किती तरी सुंदर दिसत होतें.

आणि पुतळीप्रमाणें निश्चल राहून क्रिस्तीना त्या प्रेमळ जोडप्याच्या प्रेमलीला अनिमिष नेत्रांनीं पहात होती!

**कल्पवृक्षांच्या छांयेंत**

प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई

# मोहिनी

दिवाकर उत्कंठित हृदयानें घरीं जाण्याकरितां पणजीच्या धक्क्यावर आला. घड्याळांत साडेचार वाजले, वाफोरानें जोरानें शिटी दिली व एका कामगारानें शेवटची घंटा वाजविली. बाहेरच्या आवारांत लोकांची दाटी झाली होती. तींतून प्रयासानें वाट काढीत तो तिकिटें विक-ण्याच्या खिडकीपाशीं आला. त्यानें दुसऱ्या वर्गाचें एक तिकिट विकत घेतलें आणि तो वाफोरांत वरच्या वर्गाकरितां राखलेल्या स्वतंत्र भागां-तील एका खुर्चीवर जाऊन बसला.

त्याच्याच शेजारीं एक ख्रिश्चन तरुणी येऊन बसली व पलीकडच्या खुर्चीवर एक पाद्री येऊन बसला. ती तरुणी सतरा अठरा वर्षांची असावी. पण तिची वृत्ति व पोषाक लहान व उच्छृंखल मुलाप्रमाणें होता. तिनें आपले केंस कापून लांडे केले होते. त्यामुळें तिची लांब मान, पिसें गळलेल्या कोंबडीच्या मानेसारखी विद्रुप दिसत होती.

कानांवर केंसांचीं झुलुपें राखलीं होतीं. पातळ रेशमी कापडाचा गुड-घ्याच्या किंचित् वर पोंचणारा तंग झगा घातला होता. खांद्यापासून सगळे हात उघडे होते व छातीचा अर्धा अधिक भाग गळ्यापासून मोकळा होता. दिवाकरानें तिचें चटकन् निरीक्षण केलें, व नाकानें व भुंवयांनीं आपला तिरस्कार व्यक्त करीत, त्यानें आपली दृष्टि पाद्या-कडे वळविली.

ती तरुणी जितकी बंधनाच्या पलीकडे गेलेली दिसली तितकाच तो पाद्री, कांहीं शतकांपासून अबाधितपणें चालू असलेल्या आपल्या पोषाकाला चिकटून राहिलेला होता. हा विरोध दिवाकराला मजेदार वाटला. गळ्यापासून पावलांपर्यंत अव्यवस्थितपणें लोंबणाऱ्या त्या काळ्या, सैल व पिशवीसारख्या झग्यांत त्याची कृश देहयष्टि काळ्या काठीप्रमाणें शोभत होती. सगळ्या सांसारिक सुखांचा त्याग व तिटकारा करण्याचें जन्मभर शिक्षण मिळाल्यामुळेंच कीं काय, त्याच्या निस्तेज व सुरकतलेल्या चेहेऱ्यावर उदासीनता व कठोरपणा दिसत होता. दिवाकरानें भिन्न परिस्थितींत तयार झालेले हे दोन विशिष्ट नमुने पाहिले व त्यानें आपली नजर बाहेर फेंकली.

यंत्रांची घरघर चालू झाली व एक प्रदक्षिणा घालून वाफोर चालूं लागला. वाफोराच्यामागें पाण्याची खळबळ दिसत असून त्याच्या मार्गाचा पट्टा जलपृष्ठावर स्पष्ट उमटत होता. डाव्या बाजूच्या टेंकडी-वर दीपस्तंभ दिसत होता. उजव्या बाजूला पाण्यांत कबुतरांसारख्या विविध रंगी पक्षांची रांग पाण्यावर तरंगत होती. दुरून पहाणाऱ्याला असें वाटावें कीं, फुलांची ही माळच पाण्याच्या लाटांवर तरंगत आहे. वाफोराच्या खळबळीनें उत्पन्न होण्याऱ्या लाटा नदीच्या कांठाशीं असलेल्या लहानमोठ्या होड्यांवर आदळत व त्यामुळें, कांठाच्या दगडी भिंतीला त्यांचे जोराचे धक्के बसत. आसपास कोळ्यांचे पन्हळ दिसत.

दिवाकर हें सगळें तादात्म्यानें पहाण्याचा प्रयत्न करीत होता. पण त्याच्या हृदयांत मोहिनीच्या दर्शनाची तळमळ लागली होती. नेहमीं तो दर आठवड्याला एकदां घरीं येई. पण तो ज्या बॅंकेंत काम करीत

होता त्या बँकेंत कामाची गर्दी असल्यामुळें, तो आज पंधरादिवस घरीं पोंचला नव्हता. यामुळें त्याची उत्कंठा वाढली होती व कंटाळा येऊं नये म्हणूनच तो आसपासचीं सौंदर्यस्थळें नजरेनें हुडकीत होता.

वाफोर रायबंदरच्या 'पाव्या'च्या दिशेनें चालूं लागला व याच वेळीं ती ख्रिश्चन तरुणी, तो पाद्री व त्यांच्याच शेजारीं बसलेला एक लठ्ठ ख्रिश्चन गृहस्थ यांच्यांत संभाषणाला सुरवात झाली. विषय 'स्त्रियांचें नैतिक अधःपतन' हा होता. बोलतां बोलतां तो पाद्री म्हणाला :

— वीस वर्षांच्या अनुभवाच्या आधारानें मी बोलत आहें. आतां-पर्यंत शेंकडों पतिता स्त्रियांनीं आपलें हृद्गत ( confissão ) माझ्यापुढें उघड केलेलें आहे. त्यावरून मी असें म्हणूं इच्छितों कीं, पहिलें वांकडें पाऊल हें स्त्रियांना उद्धारक होऊं शकतें....

— पाद्रीसाहेब—लठ्ठ गृहस्थ पाद्र्याला थांबवून उद्वेगानें म्हणाला — आपण म्हणतां तें क्वचित् स्त्रियांबद्दल खरें असेल; पण बहुतेक पति-तांना हा न्याय लागूं करतां येणार नाहीं. उलट, मी तर असें म्हणतों कीं, पहिलें वांकडें पाऊल ही त्यांच्या अधःपतनाच्या मार्गाची सुरवात आहे. आमच्या समाजांत पहा ना. एकदां पातक घडलें म्हणजे नीति-अनीतीचें भय न रहातां स्त्रिया निर्भयपणें व्यभिचारी बनतात.

दिवाकराची नजर रायबंदरच्या पाव्यावर खिळली होती. दर मिनि-टाला मोटारी येत जात होत्या व त्यांच्या तांबड्यालाल धुरळ्यांत पाव्याच्या कडेनें येणारे जाणारे प्रवासी अदृश्य होत होते. दोनतीन ठिकाणीं, मोठ्या पडावांत मिठागरांतून मिठाचीं पोतीं भरण्याचें काम सुरू होतें. दूरवर त्या विस्तीर्ण शेतांच्या सीमारेषेवर नारळीच्या झाडींत कालापूर व मेरशी या गांवांचीं शुभ्र घरें, ठिपक्यांप्रमाणें अस्पष्ट दिसत होतीं. पण दिवाकराचें लक्ष आतां जवळच चाललेल्या संभाषणाकडे लागलें.

पाद्र्यानें आपली बाजू पुढें मांडण्याच्या उद्देशानें म्हटलें :

— स्त्रियांच्या हातून पहिलें पापाचरण घडल्यानंतर त्यांना भयंकर पश्चात्ताप होतो. या त्यांच्या पश्चात्तापाला योग्य तें महत्त्व दिलें व

त्यांच्याकडे उदार दृष्टीनें पाहिलें तर त्यांचें वर्तन पूर्णपणें सुधारतें असा अनुभव आहे. परंतु त्यांचें पाऊल वांकडें न पडलें तर असें घडतें कीं, पापाचरणाची इच्छा बीजरूपानें त्यांच्या हृदयांत नेहमीं वास करते. ऐकायला हें विचित्र वाटतें; पण ही वस्तुस्थिति आहे. पहिल्या पापाचरणामुळेंच पुष्कळ वाईट प्रवृत्तीच्या स्त्रिया सन्मार्गगामी होतात, त्यांचा उद्धार होतो.

पाद्र्याच्या भाषेचा खरेपणा पटल्याप्रमाणें तेथें असलेल्या दोन तीन स्त्रियांनीं मुद्रा केल्या. त्या तरुणीला हें भाषण फार मानवलं. अनिर्बंध आयुष्याला एका पाद्र्याचा मिळालेला पाठिंबा पाहून तिला मनांत गुदगुदल्या झाल्या व आपला आनंद दर्शविण्याकरितांच कीं काय, तिनें वाफोराच्या यंत्राच्या घरघरीच्या तालावर आपली मोकळी भादरलेली मान जोरानें हलविण्यास सुरवात केली. पहिल्या वर्गातील बहुतेक प्रवासी वरील भाषण मोठ्या उत्सुकतेनें ऐकत होते.

— पहिल्या पापाचरणाच्या वेळीं त्यांना कडक शिक्षा केली नाहीं — तो लठ्ठ गृहस्थ म्हणाला — तर त्या जास्त बिघडण्याचा संभव असतो असें आपल्याला वाटत नाहीं काय ? — त्याच्या आवाजांत पूर्वीचा जोर नव्हता व पराजयाची छाया त्याच्या मुद्रेवर पसरली होती.

— नाहीं, मला तसें वाटत नाहीं. पहिलें पापाचरण स्त्रियांच्या हातून त्यांच्या अज्ञानाचा, साधेपणाचा इतरांनीं फायदा घेतल्यामुळेंच घडतें. त्याची त्यांना क्षमा केली नाहीं, त्यांचा त्याग केला, तर त्यांचें अचूक अधःपतन घडतें. म्हणून शहाण्या नवऱ्यानें आपल्या पत्नीचें पहिलें वांकडें पाऊल क्षम्य मानलें पाहिजे. अशानेंच त्या स्त्रीचा उद्धार केल्याचें त्याला श्रेय मिळेल — ख्रिस्ताची प्रार्थना करतांना पाद्र्यांची जशी केविलवाणी असहाय्य मुद्रा होते तशा मुद्रेनें त्या पाद्र्यानें आपलें प्रवचन संपविलें.

दिवाकरानें वरील भाषण लक्षपूर्वक ऐकलें. पण त्याला वाटलें कीं, पाद्र्यानें प्रतिपादन केलेलें मत ख्रिश्चन समाजांतील स्त्रियांसंबंधींच असावें. हिंदु स्त्रियांच्या हातून पापाचरण बहुधा घडतच नाहीं व घडलेंच तर

त्याची क्षमा तिचा नवरा करीत नाहीं व समाजहि करीत नाहीं. कारण, सगळेच तिला भ्रष्ट मानतात.

याप्रमाणें विचार करून दिवाकरानें वरील प्रश्न आपल्या मस्तकांतून घालविण्याचा प्रयत्न केला, व नदीच्या डाव्या कांठावर आपली नजर वळविली. या बाजूनें नदीचें पात्र किती तरी विस्तृत दिसत होतें. दोनतीन उपनद्यांचे फाटे मांडवीला येऊन मिळाले होते. सुकती असल्यामुळें नदीच्या तीरालगतचा चिखल उघडा पडला होता व त्यावर असंख्य बगळे आपल्या लांब टोंचींनीं मासे पकडीत फिरत होते. तीराच्या बांधावर झाडांची रांग लागली होती. त्यापुढं पसरलेल्या शेतांच्या पलीकडे एक डोंगर दिसत होता. व त्यावर कांहीं ख्रिस्ती मठ दिसत होते. परंतु, निसर्गाच्या या सुंदर दृश्यानें दिवाकराच्या हृदयांतील हुरहुर कमी होण्याऐवजीं अधिकच वाढली.

दिवाकर आपल्या लाडक्या मोहिनी संबंधीं विचार करीत आसपासच्या देखाव्याकडे शुन्य मनानें पाहात होता. ती नेहमीं प्रमाणेंच दुःखी, उदासीन, भीतिग्रस्त दिसेल कीं ती प्रेमानें आपल्यापाशीं हंसत खेळत बोलेल, यासंबंधीं त्याचे तर्क चालू होते.

वाफोर जुन्या-गोव्याला पोंचला, तेव्हां सूर्य मावळला होता व नारळीच्या झाडींतून दिसणाऱ्या भव्य ख्रिस्ती मठांच्या शिखरांवरील अजस्र घंटांचा निनाद वातावरणांत घुमत होता. मधून मधून पडझड झालेले भीषण मनोरे दिसत होते. पोर्तुगीजांच्या जुन्या वैभवाचीं स्मृतिचिन्हें म्हणूनच कीं काय, धक्क्याजवळच मोडतोड झालेल्या कांहीं नाळी, लहानमोठे गोळे यांची रास पडली होती व थोड्याच अंतरावर व्हाइसरॉयची कमान दिसत होती.

पाण्यांत जोराची खळबळ उत्पन्न करून वाफोर धक्क्याला लागला. सुकतीचा नेट असल्यामुळें, खलाशांनीं दोरखंडें टाकून तो पाण्यांत पुरलेल्या लांकडी खांबाला बांधून टाकला. दिवाकरानें बॅग हातांत घेतली व आपल्या प्रवासी सोबत्यावर नजर टाकून तो धक्क्यावर आला. तेथें त्याला सातआठ पाद्र्यांचा एक तांडा दिसला, व आपल्या प्रियेच्या

भेटीला हें एक अशुभच आहे असें वाटून त्यानें मनांतल्या मनांत दुःखी पोषाखांत गुरफटलेल्या त्या अभागी जीवांना शिव्या दिल्या.

नंतर तो कांठच्या पायऱ्या उतरून खालीं आला व एक लहानशी नाव भाड्यानें करून तींत तो बसला. नावाड्यानें नाव ढकलली व कांठाकांठानें सावकाश वल्हीं मारीत, तोंडानें एखादें पद गुणगुणत मध्येंच विडी ओढीत तो ती चालवूं लागला. अचानक भाडें मिळाल्याच्या आनंदानें तो खुष झाला होता.

दिवाकर उत्कंठित हृदयानें माडीवरच्या प्रशस्त खोलींत शिरला. खोलीच्या मध्यभागीं असलेल्या वाटोळ्या संगमरवरी टेबलावर हिरव्या कांचेच्या झांकणाचा दिवा जळत होता व त्याच्या हिरव्या फिक्कट प्रकाशानें खोलींतील सगळ्या वस्तु एक प्रकारच्या मधुर, विरळ वस्त्रांत अवगुंठित केल्याप्रमाणें वाटे. भिंतींना चिनीमातीच्या तबकड्यांवर काढलेलीं चित्रें टांगलीं होतीं; प्रत्येक खिडकीच्यावर Leonardo-da-Vinci चें एकेक आश्चर्यकारक चित्र लावलें होतें. खिडक्यांत फुलझाडांच्या कुंड्या ठेवल्या होत्या. कोंपऱ्यांत असलेल्या पलंगानें खोलींतील सौंदर्याला पूर्णत्व आलें होतें.

दिवाकरानें घाईघाईनें पोषाक उतरला व पलंगावर मच्छरदाणीच्या आंत निजलेल्या मोहिनीकडे पाहिलें. त्या विरळ, नाजुक वस्त्रांतून तिचा पहुडलेला देह आकाशांत पहुडलेल्या चंद्रासारखा शोभत होता. जणु एखादी अद्भुतरम्य परीच आकाशाच्या सुंदर भागांत विश्रांति घेत आहे असें त्याला वाटलें.

भव्य, गंभीर देवळांत देवाची भेट घेण्याकरितां ज्या गांभीर्यानें व हळुवारपणानें आपण पावलें टाकतों तशाच वृत्तीनें तो पलंगाच्या जवळ आला. दोन्हीं हातांनीं मच्छरदाणीचे एकत्र झालेले दोन्ही पदर त्यानें पलंगाच्या चौकटीवर टाकले व पलंगाच्या कडेवर बसून त्यानें प्रेमभरानें मोहिनीकडे पाहिलें.

मोहिनी उजव्या कुशीवर, गालाखालीं दुमडलेला हात ठेवून निजली होती. तिचा किंचित् लांबट व मधुरतर चेहरा दिवाकराकडे वळला होता.

तिची मुद्रा मुलाप्रमाणें सरळ, भावदर्शी, रम्य, पण कारुण्यपूर्ण दिसत होती. तिच्या काळ्याभोर भुंवयांच्या मध्यभागीं असलेली केंसांची काळी बारीक रेघ तिच्या नेत्रसौंदर्यात भर घालीत होती. श्रमातिरेकानें गोऱ्या-पान तरुणीचे गाल जिवणीकडे नाजुक रीतीनें गळलेले दिसावेत, तद्वत् जांबाच्या फळाप्रमाणें दिसणारे तिचे गाल किंचित् विगलित झालेले दिसत होते. हनुवटीच्या टोंकाशीं बारीक खळगी होती.

दिवाकरानें हळूच तिच्या दंडाला स्पर्श करून म्हटलें:

— मोहिनी...

मोहिनी दचकून उठली. तिनें गडबडीनें पदर सांवरला, केंसावरून हात फिरविला व नवऱ्याकडे पाहून अपराध्याप्रमाणें मान खालीं घातली. दिवाकरानें तिच्या चेहऱ्याचें क्षणांत निरीक्षण केलें. मोहिनीच्या साध्या, सरळ चेहऱ्यावर अपराध्याचे भाव नेहमींच कसे? हें गूढ त्याच्या हृदयाला वेदना देऊं लागलें. त्यानें दुःखगर्भ स्वरांत म्हटलें:

— तूं कां भ्यालीस?

— कोण तें समजलें नाहीं म्हणून दचकलें — मोहिनीनें मान वर न करतांच उत्तर केलें. तिचा चेहरा गोंधळला, हात कांपूं लागले, छाती धडधडूं लागली व अंगाला घाम सुटला.

दिवाकराला वाईट वाटलें. त्याच्या आगमनाची अपेक्षा करीत तिनें बसावें अशी त्याची प्रत्येक खेपेला इच्छा असे. पण प्रत्येक खेपेला त्याची निराशाच होई.

दिवाकरानें भावनांच्या आवेशांत तिचा हात आपल्या हातांत घेतला, पण तिच्या हातांतील चैतन्य, जिवंतपणा नष्ट झाल्यासारखें त्याला वाटलें. कांसवानें संकटाची सूचना मिळतांच आपलें मस्तक कवचांत ओढून घ्यावें तद्वत् आपलें पावित्र्य, प्रेम, उत्कटपणा ती आपल्या हृदयांत ओढून घेत आहे असा त्याला भास झाला.

त्यानें मोहिनीची हनुवटी धरून तिचा चेहरा वर करीत म्हटलें:

— मोहिनी, माझें सुख तुला नको का? — ह्या प्रश्नांतील भावना हृदयविदारक होती.

मोहिनीनें आपली सोज्वळ पण भेदरलेली नजर दिवाकराच्या चेहऱ्यावर स्थिर करण्याचा प्रयत्न करून म्हटलें:

—असं कां बोलायचं ? आपलं सुख तेंच माझं सुख नाहीं का ?

—मग असं कां करतेस तूं ? माझा स्पर्श झाल्याबरोबर तूं दचकतेस, अंग चोरतेस. मी दृष्टीस पडतांच तुझं स्वरूप बदलून जातं. अपराध्याप्रमाणें तुझी मुद्रा पालटते. माझ्याबरोबर मनमोकळेपणानं तूं कधीं बोलत नाहींस. तुझी इच्छा, तुझी आवड तूं मला कळवीत नाहींस. माझ्यापासून कोणतं तरी रहस्य लपवून ठेवावं म्हणून तुझी धडपड असते, अशी शंका येण्यासारखं तुझं माझ्याशीं वर्तन असतं. मी तुला आवडत नाहीं म्हणून तुझ्याकडून असं वर्तन घडतं का ?

—असं नये आपण बोलूं. आपण कां आवडणार नाहीं मला ? आपली पत्नी होण्याला मी अपात्र आहें, या कल्पनेनंच माझी अशी स्थिति होते असं आपण कां समजूं नये ? —मोहिनीनें भीतभीतच नवऱ्याच्या मुद्रेवरील भावांचें निरीक्षण करीत म्हटलें.

—भय हें आवडीचं लक्षण का ? गुप्तपणा राखणं हें प्रेम का ? तूं मला भितेस. तुझं हृदय माझ्याशीं नेहमीं गुप्त असतं.

दिवाकर थांबला. वेगवेगळ्या विचारांनीं त्याला त्रास झाला. त्यानें पुढें म्हटलें :

—मनासारखी पत्नी मिळत नाहीं म्हणून मी वयाची तिशी उलटली तरी लग्न केलं नाहीं. माझ्या आकांक्षेसारखं सौंदर्य मला तुझ्यांत आढळलं व मी लग्न केलं. त्यावेळीं मला वाटलं, कीं आतां माझ्या सुखांत न्यून राहिलं नाहीं. पण मी चुकलों. तूं माझ्याशीं परस्त्रीप्रमाणं वागतेस.

मोहिनीनें उत्तर केलें नाहीं. लहान मुलाच्या हातून अपराध घडला म्हणजे त्याची जशी मुद्रा होते तशी तिची मुद्रा झाली.

थोडा वेळ गेला. दिवाकराच्या हृदयाची अजून तळमळ चालली होती. मोहिनीनें आपल्याजवळ कांहीं तरी बोलावें, आपल्या गूढ वर्तनाचा समाधानकारक खुलासा करावा असें त्याला वाटत होतें. त्यानें म्हटलें :

— मोहिनी, तुला काय होतं तें सांग ना ग मला? माझी तुला दया येत नाहीं का?

— मला भय वाटतं—तिनें बोलण्याचा प्रयत्न केला.

— कुणाचं भय वाटतं तुला? माझं का?

— आपण थोर, उदार, श्रीमंत. मी गरिबाची मुलगी. आपण माझा स्वीकार केला हें माझं परमभाग्य. पण मला नेहमीं असं वाटतं कीं, आपण माझा त्याग कराल. ही भीति मला नेहमीं त्रास देते— मोहिनीनें उत्तर केल्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें पाहून म्हटलें.

— मोहिनी, किती वेडी आहेस तूं! मोठ्या प्रयासानं मिळविलेल्या पत्नीचा त्याग मी कां म्हणून करीन?—त्यानें तिला जवळ ओढून आपल्या बाहूंत आवळून धरलें व म्हटलें— मोहिनी, तें असो, पण मला एक सांग. तुला आपल्या मांडीवर मूल खेळावं असं वाटत नाहीं कां?

लहान मुलाची त्याला तळमळ लागली होती, ती त्यानें व्यक्त केली.

वरील प्रश्नाबरोबर मोहिनीला फार वाईट वाटल्या सारखें दिसलें. दिवाकराला सांगण्याकरितां कांहीं शब्द तिच्या ओंठापर्यंत आले, पण ते बाहेर फुटले नाहींत.

दिवाकरानें तिला जास्त त्रास दिला नाहीं. मुलाच्या बाबतींत देखील ती आपणाशीं कांहीं तरी लपवीत आहे, असें त्याला वाटलें व तो खिड-कीशीं येऊन उभा राहिला.

खोलीच्या उघड्या खिडक्यांतून आकाशांत चंद्र दिसत होता. घरा-च्यापुढें दाट झाडी पसरली होती आणि तिच्या सीमेवर एक ओढा वहात होता.



रात्रीं बराच वेळपर्यंत झोंप नसल्यामुळें सकाळ झाली तरी दिवाकर उठला नाहीं. शेजारच्या घरांत शाळा सुरू झाली व सगळीं मुलें एका सुरावर ईशस्तवन म्हणूं लागलीं, तेव्हां तो जागा झाला. त्यानें कुशीला

पाहिलें, पण तेथें त्याला मोहिनी दिसली नाहीं. त्याचें आवडतें पांढरें मांजर मात्र त्याच्या डाव्या कुशीला, त्या उबदार सान्निध्यांत ' गुरगुर ' असा आवाज काढीत पडलें होतें. दिवाकरानें त्याला अगदीं जवळ ओढलें, व त्याच्या निर्मळ पाठीवरून त्यानें प्रेमानें हात फिरविला.

खिडक्यांच्या तावदानांतून सूर्यप्रकाश खोलींत पडला होता. शेजारच्या शाळेंत मुलांची गडबड चालू होती. मधून मधून मास्तरांचा कठोर आवाज कानीं पडत होता.

तो पलंगावरून डोळे चोळीत उठला व सगळ्या खिडक्या उघडून त्यानें मांजरीला दोन्ही हातांनीं हृदयाशीं धरलें व तो खालीं आला. चौपेटीवर मोलकरीण शेणसडा घालीत होती. कोंपऱ्यांतील देव्हाऱ्याजवळ एका परडींत जास्वंदीचीं, पारिजातकाचीं फुलें दिसत होतीं. तुळईला तीनचार पिंजरे लटकत होते. एका पिंजऱ्यांतील पोपट बोलला: ' या, बसा, सन्मार्गानें वागा. '

दिवाकर पिंजऱ्याजवळ गेला. व त्यानें पोपटाचें कौतुक केलें. नंतर तो पुढें गेला, तोंच त्याचा कुत्रा त्याच्या पायांवर लोळूं लागला. त्याला बरोबर घेऊन तो मागील दारानें मागच्या कुळागारांत गेला. प्रातर्विधी उरकल्यावर तो झऱ्यापाशीं आला व त्यानें यथेच्छ स्नान केलें.

दिवाकर स्नान आटोपून घरीं परतला त्यावेळीं दहा वाजले होते. त्यानें थोडा फराळ केला व तो माडीवरील आपल्या अभ्यासाच्या खोलींत येऊन बसला.

नोकरानें मेजावर टपाल आणून ठेवलें होतें त्यांतील एक पत्र फोडून त्यानें तें वाचलें:—

—सा. न. वि. वि.

आपली पत्नी पतिता आहे. लग्नापूर्वी तिचें पाऊल वांकडें पडलेलें होतें. आपणाला ही गोष्ट ठाऊक नसली तरी आपल्या मित्रमंडळीला ती ठाऊक आहे.

आपला एक मित्र

आपल्याभोंवतीं सगळें जग फिरत आहे, असें दिवाकराला वाटलें त्याला क्षणमात्र घेरी आली. तो शुद्धीवर आला तेव्हां त्याच्या सर्वांगाला घाम सुटला होता, मस्तक बधीर झालें होतें. डोळ्यां-देखत भूकंप झालेला पहाण्याचा प्रसंग आला म्हणजे कुटुंबवत्सल भित्र्या माणसाची जी अवस्था होते तशी त्याची स्थिति झाली होती.

भावनांची पहिली खळबळ शान्त झाल्यावर तो खुर्चीवरून उठला व खोलींत जोरानें येरझारा घालीत त्यानें त्या पत्रांतील अनपेक्षित व भयंकर मजकुरासंबंधीं विचार करण्यास सुरुवात केली. मोहिनीची गोंधळलेली मुद्रा, तिचें आपल्याजवळ भीतियुक्त वर्तन, कोणतें तरी रहस्य लपवून ठेवण्याकरितां तिची चाललेली धडपड, या गोष्टी आठवून त्याला पत्रांतील आरोप खरा वाटला. पण क्षणांत तिचं भीरु सरळ मन, तिच्या मुद्रेवरील सौम्य भाव, तिचा नाजुक स्वभाव आठवून त्याला तो आरोप खरा नसावा असें वाटलें. कुणी तरी तिच्या किंवा आपल्या शत्रुत्वामुळें हें निंद्य कृत्य केलें असावें असाहि विचार त्याच्या मनांत आला. व असें असल्यास त्या निनांवी पत्रावर विश्वास ठेवून मोहिनीला शिक्षा करणें आततांईपणाचें होईल असें त्याला वाटलें. ती मुळचीच दुःखी असते, उदासीन असते. व तशा स्थितींत तिच्यावर हा आरोप केला तर तिच्या नाजुक मनावर फार मोठा आघात केल्या-सारखें होईल असे त्याला वाटलें. पण, प्रस्तुत पत्र गुप्त राखणें देखील त्याला असह्य वाटलें. कारण त्यांत केलेला आरोप इतका भयंकर होता कीं, त्यासंबंधी कांहीं तरी सोक्षमोक्ष झाल्याशिवाय त्याचें मन शान्त होणें दुरापास्त होतें. आपली पत्नी अधःपतित आहे, हें शल्य हृदयांत ठेवून दिवस कंठण्यासारखें कोणतें दिव्य असणार ?

परंतु त्याला मनापासून असें वाटलें कीं, कशाहि रीतीनें असो, हा आरोप खोटा ठरो व आपल्या पत्नीच्या सौंदर्याला मुकण्याचा आप-णावर प्रसंग न येवो. मोहिनीच्या पोटीं आपल्याला सुंदर मुलगा व्हावा, अशी त्याला कांहीं महिन्यांपासून तळमळ लागली होती. याकरितां,

ती आशा सोडण्याचा प्रसंग आपल्यावर न यावा म्हणून, त्यानें परमेश्वराची प्रार्थना केली.

या हृदयद्रावक पेंचांतून मुक्त होण्यास त्याला एकच मार्ग दिसला, व तो म्हणजे त्याचा जिवलग मित्र रामराव याकडे सगळें गुपित उघड करणें.

तो रामरावाजवळ गेला आणि त्याच्यापुढें तें निनांवी पत्र करीत त्यानें म्हटलें: " रामराव, हें पहा माझें सुख ! "

रामरावानें पत्र वाचलें आणि दिवाकराच्या खांद्यावर हात ठेवून शान्त व उपदेशकाच्या आविर्भावानें म्हटलें:

— दिवाकर, या पत्रांतील आरोपासंबंधीं तुला काय वाटतं ?

— मला कांहींच वाटत नाहीं म्हणून मी तुझ्याकडे विचारीत आहें.

— तुला स्पष्टच सांगूं का ! खरी गोष्ट मीं तुला सांगितली नाहीं तरी ती तुला समजल्याशिवाय रहाणार नाहीं. इतरांकडून ती तुला कळली नाहीं तरी मोहिनीला हें पत्र दाखवून तूं खरी गोष्ट समजून घेतल्याशिवाय रहाणार नाहींस. याकरितां तुझ्या मनाची पूर्वतयारी व्हावी, व अविचाराच्या भरांत तुझ्या हातून वाईट कृत्य घडूं नये म्हणून तुला मी सांगतों कीं, हा आरोप खरा आहे असं मला मिळालेल्या माहितीवरून म्हणणं भाग पडतं.

दिवाकरानें दुःखातिरेकानें दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेतलें व तो लहान मुलाप्रमाणें ओक्साबोक्शी रडला. कालचें आशापूर्ण जीवित आतां त्याला भयाण, निराशापूर्ण व लज्जास्पद वाटलें. रामरावाचे डोळे आसवांनीं भरून आले. त्यानें म्हटलें:

— दिवाकर, असा धीर सोडून कसं चालेल !

दिवाकराच्या संतापाचें रूपांतर निराशेंत, कारुण्यांत, उदासीनतेंत झालें. त्यानें अजाणतेपणाच्या वृत्तीनें विचारलें:

— रामराव, मी काय करूं आतां ?

— कांहीं झालं तरी तूं आततायीपणानं कोणतीच गोष्ट करूं नकोस— रामरावानें थोडा वेळ विचार करून म्हटलें — कदाचित् मला मिळालेली

माहिती खोटी असेल. आणि तसं झाल्यास हा आरोप खोटा असण्याचा संभव आहे. म्हणून खुद्द मोहिनीकडून तुला या बाबतींत खात्रीपूर्वक कांहीं तरी कळल्याशिवाय तुला कांहींच करतां येणार नाहीं. मला मिळालेली बातमी खरी असली — व ती खरी आहे असं मला वाटतं, तरी तूं तिचा त्याग करूं नकोस.

दिवाकराच्या हृदयांत आशेचा किरण चमकला, त्याला खात्री होती कीं, तो आरोप खरा आहे. पण मौज अशी कीं, तो खोटा ठरावा असें त्याला मनापासून वाटत होतें. मोहिनी भ्रष्ट स्त्री आहे, हें ऐकतांच त्याच्या भावना दुखावल्याच. पण ती भ्रष्ट ठरल्यामुळें आपणाला अंतरेल, तिचा आपणाला हरएक दृष्टींनीं त्याग करावा लागेल, या कल्पनेनें त्याला जास्त दुःख झालें होतें! हा आरोप मोहिनी सिद्ध करून देईल काय?

दुःख जितकें मोठें तितकीच आशा, शान्तता, तो क्षण ओसरल्यानंतर मनुष्याला वाटते. त्या अंधकारांतही दिवाकराला आशेचा सौम्य किरण दिसला. तो तेथें जास्त वेळ थांबला नाहीं. हृदयाचे तुकडे सांधण्याचा प्रयत्न करीत तो घरीं परतला, त्याची मनस्थिति कल्पनातीत केविलवाणी झाली होती. कौमार्यभ्रष्ट पत्नीशीं आपण लग्न केलें हें बहुतेकांना कळलेंच असेल, व अशा स्थितींत तिला आपल्यापाशीं ठेवणें यासारखें दुसरें मरण नाहीं. बरें, तिचा त्याग केला तर आपली बेअब्रू होण्याचें टळेल काय? माझें बंधन नष्ट होतांच तिचें आयुष्य स्वैर होणार! आणि माझ्या आवडीची सुंदर, प्रेमळ स्त्री उजळ माथ्यानें इतर पुरुषांना आपल्याकडे येऊं देईल, त्यांच्याशीं अनीतिकारक संबंध ठेवील, आणि हें सगळें पहाण्याचा माझ्यावर प्रसंग येईल! परमेश्वरा, काय होईल आणि काय नाहीं तुलाच ठाऊक!

मोहिनीसंबंधीं त्वेष, संताप इत्यादि भावना क्षणोक्षणीं त्याच्या हृदयांत उत्पन्न होत. पण त्याचें रूपांतर लगेच करुणेंत होई. मोहिनी त्याला आवडत नसती तर केवळ संशयाच्या आधारावरच त्यानें तिला घराबाहेर घालवून दिलें असतें, किंवा कदाचित् तिचा नाशही केला

असता. पण तिच्या विरळा, अलौकिक सौंदर्यामुळें व तिच्या पोटीं आपणाला सुंदर पुत्ररत्न होईल ही आशा हृदयांत चमकत असल्यामुळें, त्याचें मन तिच्याकडे पुन्हां पुन्हां ओढ घेई, व तिच्या नैतिक स्खलनाबद्दल वाटणारा त्वेष विरघळून जाई.

रात्र झाली. दिवाकर जेवला नाहीं. मोहिनी जेवण उरकून खोलींत आली. इतका भयंकर प्रसंग आयुष्यांत त्याच्यावर यापूर्वी ओढवला नव्हता. सौंदर्याची आसक्ति, मोहिनीपासून सुंदर मूल लाभण्याची आशा, तिच्या कृत्याचा तिटकारा, जगांत बेअब्रू होईल ही भीति इत्यादि भावनांनीं तो मूढ बनला होता. मोहिनीला आतां आपण काय विचारणार हें देखील त्याला सुचत नव्हतें.

मोहिनी नेहमींप्रमाणें धडधडत्या हृदयानेंच त्याच्या जवळ आली. हाताच्या मुठींत पत्राची घडी धरून तो पलंगावर तळमळत होता. खोलींत हिरवा प्रकाश पडला होता. बाहेर चांदणें पडलें होतें.

मोहिनीची चाहूल लागतांच दिवाकर ताडकन् उठून बसला व त्यानें कठोर आवाजांत म्हटलें: " मोहिनी, हें पत्र वाच...."

दिवाकराचा अपरिचित स्वर ऐकतांच मोहिनी दचकली. तिनें कांपऱ्या हातांत पत्र घेतलें व तें वाचलें...त्याबरोबर तिची मुद्रा कलेवरा-प्रमाणें फिक्कट झाली. तिची गाळण उडाली व साहजिकच तिच्या तोंडून बारीक, गुदमरलेल्या आवाजांत उद्गार बाहेर पडले: " देवा !..."

दिवाकर संतापातिरेकानें, सूडाच्या त्वेषानें पलंगावरून खालीं उत-रला व पलंगाच्या कडेला टेंकून असलेल्या मोहिनीचा उजवा दंड जोरानें पकडून व तो गदगदां हालवून त्यानें भयजनक आवाजांत म्हटलें:

—मोहिनी, हें खरं ना ?....

विद्युत्पातानें मनुष्याचें चैतन्य नष्ट व्हावें तशी मोहिनी दिसत होती. लग्न झाल्या दिवसापासून सांठविलेलें रहस्य, दुःख, आतां एकदम बाहेर फुटलें: " मी पापीण, मला क्षमा करा." ती जमिनीवर बसली व तिनें दोन्ही हात जोडले.

दिवाकराच्या हृदयांत उत्पन्न झालेला आशाकिरण निमाला व

त्याचबरोबर त्याचें भान नष्ट झालें. त्यानें उजव्या हाताची मूठ आवळली व सगळ्या देहांत उसळलेल्या संतापाच्या लाटेसरशीं मोहिनीच्या नाकावर मारण्याकरितां ती वर उचलली आणि रक्त फुटणाऱ्या ओंठांतून, लालबुंद चेहऱ्यानें म्हटलें : “ मोहिनी,...चांडाळणी...”

आणि त्याबरोबर मोहिनीनें आकान्तानें आपल्या पोटावर उजवा हात ठेवीत ओरडून म्हटलें: “ माझ्या पोटांत फिरणाऱ्या या आपल्या मुलाकरितां तरी मला मारूं नका ! ”

आणि हे तिचे उद्गार कानावर पडल्याबरोबर दिवाकराची आवळलेली मूठ आपोआप सुटली !

जमिनीवर कडकडून वीज पडल्यानंतर सगळीकडे गंभीर शांतता पसरावी त्याप्रमाणें दिवाकराचें झालें. त्याच्या संतापाचें रूपान्तर दयेंत, करुणेंत, प्रेमांत झालें. वात्सल्याची लाट त्याच्या रोमारोमांतून नाचली ! आपल्यापुढें बसलेली दीन, हतभागी केविलवाणी, मोहिनी पापी नसून, आपल्या मुलाची माता आहे, आणि म्हणून ती पवित्र आहे असा ध्वनि कुणी तरी आपल्या हृदयांत सोडीत आहे असा त्याला भास झाला. या मोहिनींत तो क्षणमात्र बुडून गेला !

वाफोरांतील पाद्र्याचें तें वाक्य त्याला आठवलें: “ पहिल्या पापाचरणानंतर पुष्कळ स्त्रिया सन्मार्गगामी होतात. त्यांचा उद्धार होतो ! ”

तो खालीं बसला. प्रेमाच्या आवेगांत त्यानें मोहिनीचें मस्तक आपल्या हृदयावर आवळून धरलें.

मोहिनीनेंहि त्याला मिठी मारली आणि त्या मिठींत आतांपर्यंत लपवून ठेवलेलें हृदयसर्वस्व तिनें दिवाकराला अर्पण केलें !

( “ **यशवंत** ” मासिकाच्या चढाओढीच्या ‘ लघुकथा ’ खास अंकांत दुसरें बक्षिस मिळालेली लघुकथा. )

४-८-१९३१

**कल्पवृक्षांच्या छायेंत**

प्रो. लक्ष्मणराव सरदेसाई

## " कल्पवृक्षांच्या छायेंत "



प्रकाशक :

**दत्तात्रय वामन नाईक**
न्यू ग्रीनव्हीला, ग्रँटरोड
मुंबई.

*

चित्रकार :

**एम्. व्ही. दुभाषी**

*

मुद्रक :

**मंगेश नारायण कुळकर्णी**
कर्नाटक प्रेस, कर्नाटक
हाऊस, चिराबाझार,
मुंबई.

